# बंगाली साहित्य परिचय

## मराठी माध्यमाच्या द्वारा

संपादिका – लेखिका

श्रीमती सरोजिनी कमतनूरकर




महाराष्ट्र राज्य साहित्य–संस्कृति मंडळ

१९७३

# बंगाली साहित्य परिचय

## मराठी माध्यमाच्या द्वारा

संपादिका - लेखिका
श्रीमती सरोजिनी कमतनूरकर.




महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ
१९७३

## —: निवेदन :—

भारत हे बहुभाषी राष्ट्र आहे. भारताची राष्ट्रीय एकात्मता ही पश्चिमी देशातील ‘एकराष्ट्र एकभाषा’ अशा समीकरणाची नाही. येथे वैविध्यपूर्ण व साहित्यसंपन्न अशा १५ इतर भाषा आहेत. या भाषांची व साहित्याची वाढ मुख्यतः संस्कृत भाषेच्या व साहित्याच्या प्रभावाखाली झाली आहे. इंग्रजी राज्य झाल्यानंतरच्या काळात पश्चिमी संस्कृतीच्या, पश्चिमी ज्ञानाच्या व आधुनिक शिक्षणाच्या व्दारा विचार व भावना यांचे संवादित्व या भारतीय भाषांमध्ये निर्माण होऊ लागले आहे. स्वातंत्र्याच्या आंदोलनाने व राजकीय एकात्मतेमुळे या भाषांचे वैचारिक संबंध अधिक निकटचे बनले आहेत. परंतु या भाषांचा भाषिक सीमाप्रदेश सोडल्यास, अन्योन्यसंबंध फार थोडा आहे. परंपरागत धर्म आणि इंग्रजी भाषा यांच्या व्दारेच वैचारिक, भावनात्मक व सांस्कृतिक मूल्यांची देवघेव होत आहे. ही देवघेव मोठ्या प्रमाणात होणे आपल्या सांस्कृतिक प्रगतीचा वेग वाढविण्याच्या दृष्टीने आवश्यक आहेच. परंतु, त्याहीपेक्षा भारताची राष्ट्रीय एकात्मता दृढ व अभेद्य बनविण्याकरिता अधिक आवश्यक आहे. याकरिता, महत्वाचा उपाय म्हणजे प्रादेशिक मातृभाषा बोलणाऱ्या लोकसमूहांमध्ये लगतच्या किंवा दूरच्या भारतीय प्रदेशांच्या भाषा उत्तम रीतीने अवगत केलेले, त्यापैकी एक किंवा अनेक भाषा उत्कृष्ट रीतीने लिहू किंवा बोलू शकणारे आणि त्याचप्रमाणे त्या त्या अन्य प्रादेशिक भाषेतील प्रथितयश लेखांचे, ग्रंथांचे व ग्रंथकारांचे साहित्य स्वतःच्या प्रादेशिक मातृभाषेत चांगल्या रीतीने भाषांतरित व रुपांतरित करण्यास समर्थ असलेले सुशिक्षित निर्माण होण्याची मोठी निकड आहे.

ही निकड भागविण्याची पहिली पायरी म्हणून महा राष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळाने आपली “आंतरभारती” ची योजना आखली आहे. या योजनेप्रमाणे सुशिक्षित मराठी मनुष्यास गुजराथी, उर्दू, बंगाली, कानडी इत्यादी इंडोआयर्न व द्राविडी भाषा स्वतंत्रपणे शिकता याव्या म्हणून प्रत्येक भाषेचे द्विभाषिक शब्दकोश (दोन्ही प्रकारचे म्हणजे गुजराथी-मराठी

मराठी - गुजराती असे) भाषा प्रवेश आणि साहित्य-परिचय अशी चार पुस्तके प्रकाशित करण्याचे ठरविले आहे. या कार्यक्रमानुसार मंडळाच्या वतीने 'गुजराती - मराठी शब्दकोश', 'उर्दू - मराठी शब्दकोश', 'कानडी - मराठी शब्दकोश', 'गुजराती भाषाप्रवेश' 'कानडी साहित्य परिचय' हे ग्रंथ आधीच प्रकाशित झाले असून अन्य काही भाषांचे द्विभाषिक शब्दकोश, व साहित्य-परिचय मुद्रणावस्थेत आहेत व काही संपादित होत आहेत.

मंडळाच्या आंतरभारती योजनेखाली "बंगाली साहित्य परिचय" प्रकाशित करतांना मंडळास आनद होत आहे. प्रस्तुत "बंगाली साहित्य परिचय" श्रीमती सरोजिनी कमतनूरकर यांनी मंडळासाठी संपादून तयार केला आहे. श्रीमती कमतनूरकर यांनी "परिचया" द्वारा बंगाली साहित्याची करून दिलेली ओळख मराठी वाचकास बंगाली साहित्याविषयी जिज्ञासा उत्पन्न करण्यास उपयुक्त होईल असा मंडळाचा दृढ विश्वास आहे. त्यांनी मोठ्या आस्थेने व परिश्रमपूर्वक हे काम केले आहे याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी,**

वाई, अध्यक्ष,

दि. ४ जानेवारी १९७३. महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ.

# प्रस्तावना

महाराष्ट्र–राज्य–सरकारच्या साहित्य आणि संस्कृति मंडळाने बंगाली भाषा-परिचय तयार करण्याची संधि मला दिली, याबद्दल महाराष्ट्र राज्य सरकार व साहित्य आणि संस्कृति मंडळाचे अध्यक्षांसह, सर्व सदस्य मंडळी यांचे सर्वाआधी मनःपूर्वक सादर आभार मानणे, हे माझे पहिले कर्तव्य आहे.

ही जबाबदारी मजवर सोपविण्यात आली, मी ती हौसेने व आनंदाने स्वीकारली, हे खरे, पण ती जबाबदारी स्वीकारताना, ती जड जोखीम आहे, याची मला कल्पना होती व आहे. नानाविध लहरींनी सुसमृद्ध अशा अथांग बंगाली साहित्य सागरातील काहीच थोडी रत्ने शोधून, वेंचून काढून, ती विशिष्ट पृष्ठ मर्यादेच्या एकाच छोटयाशा ग्रंथात समाविष्ट करणें, हे काम अत्यंत अवघड आहे, असे माझ्या अनुभवाला आले. वास्तविक, निरनिराळया विभाग वाङमयासाठी एकेक स्वतंत्र पुस्तक करता आले असते, तर ते काम थोडे तरी मोकळया हाताने, मनासारखे करता येणे शक्य झाले असते. परन्तु, तूर्त तरी ते शक्य नसल्याने त्या त्या काळातील, विशेष लोकप्रिय अशा थोडयाच. साहित्यिकांचे साहित्य प्रस्तुतच्या पुस्तकात समाविष्ट करता आलेले आहे. पुष्कळ मान्यवंत श्रेष्ठ साहित्यिकांना वगळावे लागले आहे; याची मला संपूर्ण जाणीव आहे. यात आले आहे ते थोडेसेच आहे, राहिले आहे, ते बरेचसे, विशाल आहे; परंतु त्याला इलाज नाही.

बंगाली भाषेच्या उच्चाराचा ढंग निराळाच आहे, त्याचा मुद्दाम खुलासा करायला हवा. संस्कृत शब्द लिहितांना त्यांच्याच लिपीत शुद्ध लिहितात, परन्तु, त्या शब्दांचा उच्चार मात्र बंगालीप्रमाणे निराळाच केला जातो. उदा. रवींद्र-नाथांचे नाव लिहिताना

रवींद्रनाथ ठाकुर असे लिहिले तरी बंगाली उच्चार
"**रोबींद्रोनाथ ठाकुर**" असा करतात.
शरत्चंद्रांना म्हणतात, 'शॉरोत्चाँद्रो चाॅट्टोपाध्याय',
"जनगणमन अधिनायक जय हे, भारत भाग्य विधाता"
हे राष्ट्रगीत बंगाली उच्चाराने
"**जॉनोगॉनोमॉनो ओधिनायोको जॉयो हे, भारोतोभाग्यो बिधाता**" असे होते

बंगाली भाषा समजावी म्हणून, द्विलिपीकात (मराठी-देवनागरी व बंगाली) बंगाली साहित्य लिहून प्रसिद्ध करण्याचा एक प्रघात दिल्लीच्या साहित्य अकादमीने अंमलात आणला असून महाराष्ट्रातही तो रूढ होतो आहे. त्याप्रमाणे, याही पुस्तकात काही पाने, मागणी प्रमाणे, द्विलिपीत घातलेली आहेत. ती व तदनुरुप अन्य बंगाली साहित्य मनातल्या मनात वाचले, तर त्याचा अर्थबोध होण्याला मदत होते. इतकेच. बंगाली भाषा आल्याचे, वाचल्याचे समाधान मुळीच मिळणार नाही. सारखे काहीतरी खटकल्यासारखे होते. कारण द्विलिपीत लिहिलेले बंगाली साहित्य मोठ्याने आपल्या मराठी उच्चाराप्रमाणे वाचले, तर ते बंगाली माणसाला कसेसेच वाटेल ; आणि बंगालमध्ये गेल्यावर त्यांची भाषा ऐकली, की द्विलिपीतून बंगाली शिकलेल्या व्यक्तीला, आपण बंगाली म्हणून शिकलो ती भाषा वेगळीच होती आणि बंगालमधील बंगाली निराळीच आहे, असे लक्षात येऊन, फार मोठा धक्का बसल्यासारखे होईल, होते. म्हणून, खरी बंगाली ज्यांना शिकायची असेल, त्यांनी संधि येईल त्या त्या वेळेला बंगाली समाजात मिसळले, वावरले पाहिजे ; त्यांची भाषा ऐकली पाहिजे, बोलण्याचा प्रयत्न केला पाहिजे, तरच कालांतराने ती भाषा त्यांच्यासारखी येऊ लागेल. कोणतीही भाषा, उच्चार व भाषेतील संकेत, इंगितांसह समजायला, यायला स्वतःच्या वाचनाबरोबरच त्या भाषिकांशी मिळून, मिसळून वावरणे व मोतीदाणे टिपल्याप्रमाणे त्या भाषेतील स्वर, ठास, संकेत, श्लेषार्थ इ. शिकून घेणे, हाच एक मार्ग असतो. आणि तशी ती शिकल्याशिवाय त्या भाषेचा खरा रसास्वाद घेता येत नाहीच. बंगालीच्या बाबतीत ते विशेष खरे आहे. त्या दृष्टीने, प्रस्तुतचे पुस्तक फक्त भाषा समजण्याच्या दृष्टीने प्रतिहारीचे काम करणार आहे.

मराठी प्रमाणे बंगाली भाषेच्या शुद्धलेखनातही काळाबरोबर बदल होत गेला आहे. संस्कृत शब्द कटाक्षानें शुद्ध लिहिले जातात. परन्तु, पूर्वी काही शब्दांवर जोर देऊन त्या उच्चाराप्रमाणे लिहित असत. उदा. 'धर्म' हा शब्द 'धर्म्म', 'कर्तव्य' हा 'कर्त्तव्य', 'पूर्व' हा 'पूर्व्व' इत्यादि. कालमानाबरोबर त्यांचे शुद्धलेखनही सोपे होऊ लागले. या पुस्तकातले साहित्य त्या त्या काळात, त्या त्या सहित्यिकांनी आपले साहित्य जसे लिहिले, जसे ते छापून प्रसिद्ध झाले व होते आहे, त्याप्रमाणेच घातले आहे. कारण, ज्यांचे जसे होते व आहे, तसेच ते ठेवणे इष्ट-कर्तव्य आहे.

काही संस्कृत शब्दांचे अर्थ मराठीत प्रचलित असलेल्या अर्थाहून निराळ्या अर्थाने बंगालीत वापरले जातात. उदा. 'विचित्र' या शब्दाचा मराठी ध्वनी

निराळा आहे. परन्तु, बंगालीत 'विचित्र' याचा 'विविध' अशा अर्थाने वापर आहे. "सत्कार" याचा मराठी अर्थ मानसम्मान, गौरव असा, तर बंगालीत तो "अंत्यसंस्कार" या अर्थांने वापरला जातो. अशा मराठीहून भिन्न अर्थाने वापरात असलेल्या शब्दांचे शेवटी परिशिष्ट २ मध्ये दिलेले आहेत.

हा संकलन ग्रंथ तयार करताना सर्वात मोठी अडचण होती, मला हवी ती पुस्तके मिळण्याची. मिरजेसारख्या गावीं राहून आपल्याला हवी असलेली बंगाली पुस्तके मिळायची कशी, या विवंचनेत होते मी. परन्तु, माझे थोरले बंधु, श्री. यशवंत पुरुषोत्तम हुदलीकर व अलाहाबादेजवळ बमरौलीस राहणारे माझे आर्टिस्ट बंधु श्री. शरद पुरुषोत्तम हुदलीकर हे दोघे सदाचे माझे पाठीराखे माझ्या साह्याला हौसेने धावले. त्या दोघानी, मला हवी ती पुस्तके मिळवून, मजकडे पाठवून दिली, त्यांचे आभार मानले तर त्याना दुखावल्यासारखे होईल. वाईट वाटेल. पण मनतळीची कृतज्ञ भावना व्यक्त केल्यावाचून राहवत नाही. तितक्याच प्रेमाने, कै. मामासाहेब वरेरकर यांच्या सुकन्या श्रीमती माया चिटणीस यांनी मामांच्या कपाटातील, मला जरूर असलेली पुस्तके काढून दिली. माझ्या मुंबईतील वंग-भगिनी श्रीमती शोभादिदिनणि घोष, गुर्जर भगिनी, प्रा. जयाबेन मेहता आणि मामासाहेब देवगिरीकर व मुंबई विद्यापीठाच्या लायब्रेरीचे श्री. मार्शल या सर्वांनी ज्या सौजन्याने मला पुस्तके पुरविली, त्यांचे ऋण सदैव माझ्या स्मृतीत राहील.

अनेकविधि अनिवार्य अडचणीमुळे मुद्रणप्रत सादर करायला मला उशीर झाला. परन्तु माझ्या अडचणी सहानुभूतिने समजून घेऊन, श्री. सेतुमाधवराव पगडी व राजाध्यक्ष या उभयता साहित्य व संस्कृति मंडळाच्या चिटणीसांनी मला अधिक वेळ दिला, त्याबद्दल त्यांचे आभार मानल्याशिवाय राहवतच नाही.

शेवटी, प्रवेशिका लिहून झाली, पण त्याची मुद्रण प्रत तयार करायलाही वेळ मिळेना. अशा वेळी, कु. आशा आपटे, बी.ए.—मिरजेच्या विद्यामंदिर प्रशालेच्या अध्यापिका—ही आपणहून पुढे झाली. आणि तिने आपली अनेक कामे बाजूस ठेवून माझ्या प्रवेशिकेची मुद्रणप्रत तयार करून दिली. मुलगी झाली, म्हणून तिचे आभार मानायचे नाहीतच कां? अशाच सुकन्या आम्हाला बहुसंखेने हव्या आहेत. एवढे म्हणते.

ज्या जिज्ञासू लोकांसाठी हा ग्रंथ तयार करण्यांत आला, त्यांना तो आवडो, उपयोगी ठरो, एवढीच इच्छा आहे.

"जीवने यत पूजा होलो ना सारा
जानी हे जानी ताओ हयनी हारा"
"जीवनी केली पूजा अपुरी राहिली
जाणितो तरी ना ती विफल जाहली"

श्रीमती सरोजिनी कमतनूरकर

# अनुक्रमणिका

प्रवेशिका

## पद्य विभाग


| | | | |
|---|---|---|---|
| १. | छेले भुलानो छडा | | ३ |
| २. | कृतांजलि | विद्यापति | ११ |
| ३. | सीतार विवाह | कृत्तिवास ओझा | १२ |
| ४. | श्याम सुंदर | चंडीदास | १४ |
| ५. | हताशेर आक्षेप | ज्ञानदास | १५ |
| ६. | कालकेतूर विक्रम | मुकुंदराम चक्रवर्ती | १६ |
| ७. | शिवेर दक्षालये यात्रा | भारतचंद्र राय | १८ |
| ८. | श्रेष्ठपूजा | रामप्रसाद सेन | १९ |
| ९. | फुल-कपि | ईश्वरचंद्र गुप्त | २१ |
| १०. | आत्मविलाप | माइकेल मधुसूदन दत्त | २२ |
| ११. | जीवन संगींत | हेमचंद्र बंधोपाध्याय | २४ |
| १२. | आशा | नवींनचंद्र सेन | २६ |
| १३. | समुद्र दर्शन | बिहारींलाल चक्रवर्ती | २८ |
| १४. | धनधान्ये पुष्पे भरा | द्विजेंद्रलाल राय | ३१ |
| १५. | भारतेर जय | सत्येंद्रनाथ ठाकुर | ३२ |
| १६. | पाछेलोके किछुबले | कामिनीं राय | ३५ |
| १७. | संध्या | अक्षयकुमार वडाल | ३७ |
| १८. | अशोक तरु | देवेंद्रनाथ सेन | ३९ |
| १९. | छिन्न मुकुल | सत्येंद्रनाथ दत्त | ४० |

| | | |
|---|---|---|
| २० हयतो | कुमुदरंजन मल्लिक | ४२ |
| २१. आबोल-ताबोला | सुकुमार राय | ४४ |
| २२. शिशु | रवींद्रनाथ ठाकुर | ४८ |
| २३. गीतांजलि | रवींद्रनाथ ठाकुर | ५६ |
| २४. शिवाजी उत्सव | रवींद्रनाथ ठाकुर | २८ |
| २५. बाङला मा | काजी नजरुल इस्लाम | ६४ |

## गद्य - विभाग

| | | |
|---|---|---|
| १. पुरातन बांगला भाषार नमुना | | ६७ |
| २. तोता इतिहास | चंडिचरण मुनशी | ७१ |
| ३. शकुंतलार प्रतिगृहे यात्रा | ईश्वरचंद्रमित्र विद्यासागर | ७५ |
| ४. कंकणमाला–कांचनमाला | दक्षिणारंजन मजुमदार | ८० |
| ५. वसंतेर कोकीळ | बंकिमचंद्र चट्टोपाध्याय | ८७ |
| ६. सागरसंगमे नवकुमार | बंकिमचंद्र चट्टोपाध्याय | ९१ |
| ७. महाराष्ट्र जीवन प्रभात | रमेशचंद्र दत्त | ९९ |
| ८. पत्रावली | स्वामी विवेकानंद | ११० |
| ९. प्राच्य ओ पाश्चात्य | श्रीं. अरविंद घोष | १२२ |
| १०. तोता काहिनी | रवींद्रनाथ ठाकुर | १२८ |
| ११. बाजे कथा | रवींद्रनाथ ठाकुर | १३३ |
| १२. पनेरो आना | रवींद्रनाथ ठाकुर | १३८ |
| १३. श्रीकांत (प्रथम खंड) | शरत्‌चंद्र चट्टोपाध्याय | १४४ |
| १४. पत्रावली | शरत्‌चंद्र चट्टोपाध्याय | १५३ |

| | | |
|---|---|---|
| १५. आरोग्य - निकेतन | ताराशंकर बंधोपाध्याय | १६० |
| १६. चंद्रगुप्त (नाटकातील काही प्रवेश) | द्विजेंद्रलाल राय | १६८ |
| १७. मंत्रशक्ति | प्रमथ चौधुरी | १९९ |
| १८. रुंपोकाका | बिभुतिभूषण बंधोपाध्याय | २०६ |
| १९. कथामालार अप्रकाशित गल्प | प्रमथनाथ बिशी | २१६ |
| २०. भारत चिंता | प्रमथनाथ बिशी | २१९ |
| २१. भेजालेर उत्पत्ति | मनोज बसु | २२७ |
| २२. भाडाटेचाई (नाटकातील प्रवेश) | नारायण गंगोपाध्याय | २३८ |
| २३. एइ युध्द | सुमथनाथ घोष | २५७ |
| २४. तुमि कि सुंदर | बुध्द देव बसु | २६६ |

| | |
|---|---|
| परिशिष्ट (१) | i |
| परिशिष्ट (२) (काव्य विभाग) | xv |
| परिशिष्ट (३) (गद्य विभाग) | xlv |

# অনুক্রমণিকা

## প্রবেশিকা

### পদ্য বিভাগ


| | | | |
|---|---|---|---|
| ১ | ছেলেভুলানো ছড়া | | ৩ |
| ২ | কৃতাঞ্জলি | বিদ্যাপতি | ১১ |
| ৩ | সীতার বিবাহ | কৃত্তিবাস অঝা | ১২ |
| ৪ | শ্যাম-সুন্দর | চণ্ডীদাস | ১৪ |
| ৫ | হতাশের আক্ষেপ | জ্ঞানদাস | ১৫ |
| ৬ | কালকেতুর বিক্রম | মুকুন্দরাম চক্রবর্তী | ১৬ |
| ৭ | শিবের দক্ষালয়ে যাত্রা | ভারতচন্দ্র রায় | ১৮ |
| ৮ | শ্রেষ্ঠপূজা | রামপ্রসাদ সেন | ১৯ |
| ৯ | ফুল-কপি | ঈশ্বরচন্দ্র গুপ্ত | ২১ |
| ১০ | আত্মবিলাপ | মাইকেল মধুসুদন দত্ত | ২২ |
| ১১ | জীবন সঙ্গীত | হেমচন্দ্র বন্দ্যোপাধ্যায় | ২৪ |
| ১২ | আশা | নবীনচন্দ্র সেন | ২৬ |
| ১৩ | সমুদ্র–দর্শন | বিহারীলাল চক্রবর্তী | ২৮ |
| ১৪ | ধন ধান্যে পুষ্পে ভরা | দ্বিজেন্দ্রলাল রায় | ৩১ |
| ১৫ | ভারতের জয় | সত্যেন্দ্রনাথ ঠাকুর | ৩২ |
| ১৬ | পাছে লোকে কিছু বলে | কামিনী রায় | ৩৫ |
| ১৭ | সন্ধ্যা | অক্ষয়কুমার বড়াল | ৩৭ |
| ১৮ | অশোক তরু | দেবেন্দ্রনাথ সেন | ৩৯ |
| ১৯ | ছিন্ন মুকুল | সত্যেন্দ্রনাথ দত্ত | ৪০ |
| ২০ | হয়ত' | কুমুদরঞ্জন মল্লিক | ৪২ |

| | | | |
|---|---|---|---|
| ২১ | আবোল তাবোল | সুকুমার রায় | ৪৪ |
| ২২ | শিশু | রবীন্দ্রনাথ ঠাকুর | ৪৮ |
| ২৩ | গীতাঞ্জলী | ,, ,, | ৫৬ |
| ২৪ | শিবাজী উৎসব | ,, ,, | ৫৮ |
| ২৫ | বাঙ্‌লা মা | কাজী নজরুল ইসলাম | ৬৪ |


## গদ্য বিভাগ


| | | | |
|---|---|---|---|
| ১ | পুরাতন বাংলা ভাষার নমুনা | | ৬৭ |
| ২ | তোতা ইতিহাস | চণ্ডিচরন মুনশী | ৭১ |
| ৩ | শকুন্তলার পতিগৃহে যাত্রা | ঈশ্বরচন্দ্র বিদ্যাসাগর | ৭৫ |
| ৪ | কাঁকণমালা কাঞ্চনমালা | দক্ষিণারঞ্জন মিত্র-মজুমদার | ৮০ |
| ৫ | বসন্তের কোকিল | বঙ্কিমচন্দ্র চট্টোপাধ্যায় | ৮৭ |
| ৬ | সাগর সঙ্গমে নবকুমার | ,, ,, | ৯১ |
| ৭ | মহারাষ্ট্র-জীবন প্রভাত | রমেশচন্দ্র দত্ত | ৯৯ |
| ৮ | পত্রাবলী | স্বামী বিবেকানন্দ | ১১০ |
| ৯ | প্রাচ্য ও পাশ্চাত্য | শ্রী অরবিন্দ ঘোষ | ১২২ |
| ১০ | তোতা-কাহিনী | রবীন্দ্রনাথ ঠাকুর | ১২৮ |
| ১১ | বাজে কথা | ,, ,, | ১৩৩ |
| ১২ | পনেরো আনা | ,, ,, | ১৩৮ |
| ১৩ | শ্রীকান্ত [প্রথম খণ্ড] | শরৎচন্দ্র চট্টোপাধ্যায় | ১৪৪ |
| ১৪ | পত্রাবলী | ,, ,, | ১৫৩ |

| | | | |
|---|---|---|---|
| ১৫ | আরোগ্য-নিকেতন | তারাশংকর বন্দ্যোপাধ্যায় | ১৬০ |
| ১৬ | চন্দ্রগুপ্ত - নাটক | দ্বিজেন্দ্রলাল রায় | ১৬৮ |
| ১৭ | মন্ত্রশক্তি | প্রমথ চৌধুরী | ১৯৯ |
| ১৮ | রুপোকাকা | বিভূতিভূষণ বন্দ্যোপাধ্যায় | ২০৬ |
| ১৯ | কথামালার অপ্রকাশিত গল্প | প্রমথনাথ বিশী | ২১৬ |
| ২০ | ভারত চিন্তা | ” ” | ২১৯ |
| ২১ | ভেজালের উৎপত্তি | মনোজ বসু | ২২৭ |
| ২২ | ভাড়াটে চাই | নারায়ণ গঙ্গোপাধ্যায় | ২৩৮ |
| ২৩ | এই যুদ্ধ | সুমথনাথ ঘোষ | ২৫৭ |
| ২৪ | তুমি কি সুন্দর | বুদ্ধদেব বসু | ২৬৬ |
| | পরিশিষ্ট [১] | | i |
| | পরিশিষ্ট [২] | পদ্য বিভাগ | xv |
| | পরিশিষ্ট [২] | গদ্য বিভাগ | xlv |

# प्रवेशिका

बंगाल आणि महाराष्ट्र यांचे नाते फार निकटचे आहे. बोली-चाली, रीति-रिवाज, धार्मिक विधि, संस्कार-संस्कृति या सर्वच बाबतीत महाराष्ट्र आणि बंगाल यांच्यात भावाभावात आढळून येणाऱ्या सादृश्याप्रमाणे सादृश्य आणि जवळीक आढळून येते. म्हणूनच बंगाली साहित्याकडे महाराष्ट्राचे लक्ष वेधणे स्वाभाविक आहे.

भरघोसशा बंगाली साहित्याकडे महाराष्ट्राचे लक्ष वेधून बरीच वर्षे झाली. पूर्वी एकमेव दर्जेदार मासिक 'मनोरंजना'चे विद्वान संपादक कै. काशिनाथ रघुनाथ मित्र आणि मनोरंजनाचेच सहकारी कै. वि. सी. गुर्जर यांनी बंगाली भाषेचा अभ्यास करून कांहीं बंगाली साहित्य अनुवादरूपाने महाराष्ट्राला परिचीत करून दिले. त्यामुळे बंगालच्या आधुनिक कादंबरीचे जनक बंकिमचंद्र चट्टोपाध्याय, रमेशचंद्र दत्त अशा थोर बंगाली साहित्यिकांचे थोडेफार वाङ्मय महाराष्ट्राला माहित झाले. कै. ह. ना. आपटे यांच्या वाङ्मया-वर बंगाली साहित्याचा छाप दिसतो. कै. रमेशचंद्र दत्त यांच्या 'महाराष्ट्र जीवन प्रभात' या कादंबरीचे दुसरे प्रकरण, आणि हरिभाऊंच्या 'उषःकाल' या कादंबरीचे पहिले प्रकरण, ही दोनही प्रकरणे शेजारी ठेवून वाचून पाहिल्यास तें स्पष्ट दिसते. कै. ह. ना. आपटे यांनीं टागोरांच्या 'गीतांजली'चा केलेला अनुवाद मॅकमिलन कंपनीने त्याकाळी प्रसिद्ध केल्याने, नोबेल पारि-तोषिक विजेती गीतांजली महाराष्ट्राला उपलब्ध झाली. ह. ना. आपट्यांनंतर गीतांजलीचे आणखीही अनुवाद झालेले आहेत, हे लिहिण्याची आवश्यकता नाही. 'शारदाश्रमवासी' काणे यांनीही काही बंगाली पुस्तकांचा मराठीत अनुवाद केला होता. कै. वासुदेव गोविंद आपटे यांनी आपल्या 'बंगाली शिक्षक' यासारख्या पुस्तकाने महाराष्ट्राला ऋणी केले. कालांतराने कै. मामा-साहेब वरेरकर यांनी शरत्‌चंद्रांच्या कादंबऱ्या मराठी वाचकांच्या हाती दिल्या रवींद्रनाथांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने रवींद्रनाथांचे शक्य तेवढे साहित्य दिल्लीच्या साहित्य अकादमीने मराठीत आणले. कै. बुद्धिसागर यांनीही कांहीं बंगाली पुस्तकांचा अनुवाद केलेला आहे. विवेकानंदांचे वाङ्मय मराठी वाच-

कांना मराठीत लाभले आहे. अशा रीतीने गेल्या पाऊण शतकाच्या कालावधीत थोडेफार बंगाली वाङ्मय अनुवादरूपाने महाराष्ट्राच्या परिचयाचे झाले.

परंतु, तेवढ्याने भागण्यासारखे नव्हते. वाहत्या गंगोदकाचे स्वारस्य भिंतीतील नळातून येणाऱ्या पाण्यानें कसे कळू शकणार ? बंगाली भाषा आणि बंगाली साहित्याविषयींची महाराष्ट्रातील वाढती जिज्ञासा किंचित तरी तृप्त होण्याच्या दृष्टीने बंगाली साहित्य मूळ स्वरूपातच, मूळ भाषेतच, थोडेसे कां होईना, मराठी जिज्ञासूंच्या हाती देणे आवश्यक वाटले. त्यादृष्टीने महाराष्ट्र सरकारने आपल्या 'आंतरभारती भाषाभारती'च्या विद्यमाने महाराष्ट्रीयांसाठीं कांहीं ग्रंथ (उदा० बंगाली-मराठी शब्दकोश, बंगाली भाषा प्रवेश) तयार करण्याचे ठरविले, हे केवळ उचितच नव्हे, तर स्वागतार्ह असे महत्वाचे काम आहे. सरकारनें योजिलेल्या ग्रंथात, जी उत्सुक आणि उत्साही मंडळी बंगाली भाषा शिकली असतील त्यांना बंगाली भाषेतील साहित्याचे अत्यल्प असे तरी प्रतिनिधिक स्वरूपाचे दर्शन घडावे, त्या भाषेच्या साहित्याची निदान त्यांना तोंडओळख व्हावी या हेतूने महाराष्ट्रसरकारच्या साहित्य आणि संस्कृति मंडळाने एक संकलन ग्रंथ—बंगाली साहित्य परिचय—काढायचे योजिले. प्रस्तुतचा ग्रंथ हे त्या योजनेचे मूर्त स्वरूप होय.

## बंगाली भाषेची उत्पत्तीः—

बंगालची साहित्यसाधना बंगालमधे आर्य आल्यानंतर सुरू झाली. वैदिक धर्मावलंबी आर्यांची वस्ती पंचनदाच्या तटाकी झाल्यानंतर बराचकाळ-पर्यंत त्यांचा बंगालशी तसा कांही संबंध नव्हता. वैदिक सूक्तात बंगालचा उल्लेख दिसत नाहीं. ऐतरेय ब्राह्मणात अनार्य व दस्यु म्हणून ज्या जमातींचा उल्लेख आहे. त्यांत 'पुंड्र' नावाच्या जमातीचा उल्लेख आहे. सदरहु पुंड्र लोक बंगालच्या उत्तर भागात राहात असत; आणि उत्तरबंगालचे नावही होते 'पुंड्रभूमी' ऐतरेय आरण्यकात बंगालच्या अधिवाशांचा निंदाव्यंजक उल्लेख आहे.

बंगालमध्ये आर्यभाषा आणि आर्यसंस्कृति येण्यापूर्वी तेथे अनार्य द्राविड आणि ऑस्ट्रिक जमातींची वस्ती होती. त्यामुळे बरीच वर्षें त्या भूभागात जाऊन वास्तव्य करणे आर्य लोक निषिद्ध मानीत असत. इतकेच नव्हे तर, बंगालमधे जाउन आलेल्या आर्यांना प्रायश्चित्त घेतल्याशिवाय आपल्या समाजात समाविष्ट होता येत नसे. सुरवातीस जे कोणी आर्य त्या भागात जात असत, किंवा तेथे जाउन वस्ती करत असत, त्यांना 'व्रात्य' किंवा नष्ट-पतित मानले जाई.

कालांतराने ही परिस्थिती पालटली. आर्य सर्रास बंगालच्या भूमीवर जाऊन वास्तव्य करू लागले. त्यांच्याबरोबरच त्यांची भाषा, धर्म, सामाजिक रीतिभाती आणि संस्कृति बंगालमधे रूजली गेली, रुळली, वाढीस लागली. बंगालमधली प्राचीन अनार्य भाषा लुप्त झाली. वैदिक, पौराणिक आणि बौद्ध व जैन धर्म यांचा तेथे प्रसार झाला; वर्णाश्रमाच्या नियमनिर्बंधनुसार बंगाली समाजाला वळण-घडण लागले. अशा रीतीने अनार्य द्राविड वंगभूमीचा सर्वांगीण कायापालट होऊन, बंगाल आर्यावर्ताचा एक भाग गणला गेला.

विशेषतः मौर्यांच्या कारकीर्दीत बंगालमधे आर्यांची वसति जोरात सुरु झाली. मौर्य राजवटीत बंगाली लोकांनीं मगध देशाहून आलेली आर्यांची भाषा उचलली होती. आणि गुप्त घराणे राज्यावर असतांना बंगाल संपूर्णपणे भाषा, आचारविचार, रीतिरीवाज आणि संस्कृति यांच्या बाबतीत आर्य बनला गेला. चिनी पर्यटक ह्यूएनत्संग यांना त्यांच्या प्रवासकाळी गौड, वंग, कामरूप, राढ येथे एकाच भाषेची चलती आढळून आली. त्यावरून ख्रिस्ती सातव्या शतकाच्या पूर्वीच बंगालचे आर्यीकरण संपूर्ण झाले होते असे म्हणावे लागते.

बंगालमधे आर्य भाषेचा प्रसार झाल्यानंतर बरीच वर्षे पर्यंत तेथे संस्कृत आणि प्राकृत मधे साहित्य-निर्मिति होत होती. त्यावेळची प्राकृत भाषा म्हणजे 'पूर्वी-प्राकृत', वररुचि आदि करून व्याकरणकार आणि दंडी आदि करून अलंकार शास्त्रज्ञ यांनी ज्याला 'मागधी भाषा' म्हटले आहे, ती मागधी भाषा या पूर्वी-प्राकृतचेच विशिष्ट रूप होते.

ख्रिस्ती सातव्या शतकापूर्वी बंगालमधे जी संस्कृत गद्य-पद्य रचनेची विशिष्ट पद्धति होती, त्याला गोडी-रीति असे नाव पडले होते. बाणभट्टानीं आपल्या हर्ष चरित्रात भारतातील निरनिराळ्या प्रांतात प्रचलित असलेल्या तत्कालीन संस्कृत साहित्याच्या विशिष्ट शैलींचे जे वर्णन केले आहे त्यात गौडी शैलीला 'अक्षर-डंबर' असे म्हटले आहे. अक्षर-डंबर याचा अर्थ विशिष्ट शब्द योजनेने ध्वनिनिर्मिति म्हणजे, बंगालमधील तत्कालीन संस्कृत साहित्य निर्माते आपल्या अक्षर-डंबराने जे ध्वनिंचे लावण्य निर्माण करीत ते बाणभट्टाच्या नजरेत भरले होते. अलंकारशास्त्रज्ञ भामह आणि दंडी (सातवे ते आठवे शतक) यानीं 'गौड-मार्ग' व 'गौडी-रीति' यांची प्रशंसा केलेली आहे. त्यांच्यामते त्याकाळी संस्कृत काव्यात गौडी आणि वैदर्भी या दोनच रीति मुख्यत्वे करून होत्या म्हणजे, बंगालमधील मूळच्या रहिवाशांची भाषा जरी अनार्थ द्राविडी असली, तरी आज बंगाली शारदेचे निवासस्थान असलेल्या उज्वल आणि भव्य अशा दालनाची पायाभरणी आर्यांच्या भाषेने, संस्कृतने झाली म्हणूनच, बंगाली भाषेला संस्कृतोत्पन्न संस्कृतप्रचुर म्हणणेच युक्त होईल.

पुढे 'पाल' आणि 'सेन' घराण्यातील राजांच्या कारकीर्दी संस्कृति साहित्यिक, कवि यांना आश्रय देणाऱ्या झाल्या. त्यामुळे आणखी बरेच संस्कृत वाङमय बंगालमधे निर्माण झाले. पालांच्या वेळी अभिनंद नावाचे एक कवि होऊन गेले. त्याने संस्कृतमधे 'रामचरित' नावाचे रामायण काव्य लिहिले. आणखीही एक रामायण संध्याकर नंदी नावाच्या कवीनी लिहिले होते. संस्कृतमधे बरीचशी नाटकेही त्याकाळी बंगालमध्यें लिहिली गेली. पैकी भट्टनारायण यांचे 'वेणीसंहार' (आठवे शतक) आणि मुरारी मित्र यांचे 'अनर्घ्य-राघव' (दहावे, अकरावे शतक) ही उल्लेखनीय होती.

सुरवातीस, म्हणजे जेव्हां बंगालमधे संस्कृतमधे गद्य-पद्य काव्य-साहित्य निर्मितीचा काळ होता तेव्हां मोठी काव्ये फारशी लिहिली जात नव्हती. छोटी छोटी काव्येच विशेषतः लिहिली जात. तशा सर्व संस्कृत कविता, किंवा श्लोकाचे दोन संकलन ग्रंथ उपलब्ध झाले आहेत. 'कविवचनसमुच्चय'

आणि 'सदुक्तिकर्णामृत' हे ते दोन ग्रंथ. पैकी पहिला खिस्ती सन १२०० च्या सुमारास किंवा तत्पूर्वी संकलित झाला; आणि दुसरा खिस्ती सन १२०६ मधे लक्ष्मणसेन राजाच्या कारकीर्दीत श्रीधरदास यांनीं संकलित केला. कविवचनसमुच्चयात श्रीकृष्णांच्या व्रजलीलांचे वर्णन असून सदुक्तिकर्णामृतात तर बंगाली ग्रामीण जीवनाचे वास्तव दर्शन, बंगाली गृहस्थजीवनाचे चित्र सुस्पष्टपणें उमटले आहे. नमुन्यासाठी पुढील श्लोक लक्षात घेण्यासारखा आहे:—

चलत् काष्ठम् गलत् कुड्यामुत्तानतृण संचयम् ।
गंडुपदार्थीमंडूकाकीर्णम् जीर्णम् गृहम् मम ॥

(झोपडीच्या लाकडी खुंट्या, खांब हलताहेत, मातीच्या भिंतींचे ढेपसे पडलेले आहेत, छपरावर वाळलेले गवत काटकुट्या नाहीत अशी ही माझी झोपडी गांडुळाच्या शोधात असलेल्या बेडकासारखी बनलेली आहे.)

हे वर्णन वाचत असतांना मुकुंदराम या कविने केलेल्या मोडकळीला आलेल्या झोपडीचे वर्णन आठवल्यावाचून राहात नाही. मुकुंदरामानीं म्हटले आहे :—

भांगा कुड्या घर तार छालपातार छायनीं
भेरेंडार खुंटी तार आछे मध्य घरे
प्रथम वैशाख मासे नित्य पडे झडे ।

त्याच्या मोडकळीला आलेल्या कुंडेघरावर (झोपडीवर) ताडपत्रीचे छत आहे; माजघरात एरंडाचे खांब व खुंट्या आहेत; वैशाख महिन्याच्या प्रारंभी त्या झोपडीची नेहमीच पडझड होत असते.

**जयदेव:—**

लक्ष्मणसेन राजाच्या दरबारी धोयी, उमापतिश्वर, गोवर्धन, शरण आणि जयदेव असे पांच सुप्रसिद्ध कवि होते. पैकी गीतगोविंदकार जयदेव हा सर्वश्रेष्ठ मानला जात असे. जयदेवांच्या गीतगोविंदातील पदावली (पद्यावली)

बंगालमधील वैष्णवभक्त आणि रसिकजनांना सदैव प्रिय आणि आदरणीय ठरलेल्या आहेत. जयदेवांच्या गीतगोविंदाच्या पार्श्वभूमीवर, आधारावर बंगालमधील वैष्णव धर्माचा अभिनव विकास झाला. बंगाली वैष्णवधर्म हा एक फार शक्तीमान संप्रदाय ठरला. म्हणूनच ज्या बंगाली गीति कविता बंगाली साहित्याचे एक महत्वपूर्ण प्रभावी अंग ठरल्या, त्या गीति कवितांचा आदिकवि जयदेव असे बंगाली लोक मानतात. गीतगोविंदाचा विषय राधाकृष्णाच्या प्रेमलीला असून ते काव्य संस्कृतमधे रचले गेले. हे खरे असले तरी कविने संस्कृत भाषेला आपल्या काव्यात नव्या वळणाने राबवली असून, काव्याचा भाव, जीवसूर बंगाली आहे. बंगालची स्निग्धशामल वनभूमी बंगालमधील निसर्गवैभव जयदेवाच्या पदावलीशी एकरूप झाल्याकारणाने बंगाली लोकांना जयदेव आणि त्याचे गीतगोविंद जीवाभावाचे वाटत असल्यास नवल नाही. खेरीज बंगाली पदावलीतील साहित्य. कीर्तन, पांचाली, यात्रा, कविगान इत्यादी अंगे अशी ना तशी जयदेवाची ऋणी आहेत. म्हणूनच जयदेवाला बंगाली 'कीर्तना'चा आदिगुरु मानतात.

पाल आणि सेन राजांच्यापूर्वी आणि त्यांच्याकाळी बंगालमध्ये जी संस्कृत वाङ्मयाची साधना झाली, त्याच्याच परिणामी बंगाली लोकांचा रामायण, महाभारत, भागवत, पुराणे इत्यादींशी निकटचा संबंध आला. त्या सर्व ग्रंथातून पुढे बंगाली कवींना काव्यनिर्मीतीसाठी भरपूर विषय लाभले. संकृत ढंग आणि विषय-वस्तु यांशी बंगाली लोक-संस्कृतीचा प्रभावी मिलाफ होऊन बंगाली साहित्याची निर्मिती झाली. थोडक्यात म्हणजे, खि. स. च्या दहाव्या शतकापासून बंगालमधे संस्कृत भाषेत साहित्य निर्माण करणे मागे पडूं लागलें आणि 'बंगाली' या नवीन आर्य भाषेत साहित्य लिहिले जाऊ लागले तरीपण, खि. स. दहाव्या पासून बाराव्या शतकाच्या दरम्यानच्या काळात व्हावे तसे बंगाली साहित्य निर्माण होऊ शकले नव्हते. त्या दोन शतकांच्या मधला काळ बंगालमधे विशिष्ट 'अबहट्ठ' व 'अपभ्रंश' भाषेत साहित्य रचनेचा झाला. त्याच अबहट्ठ व अपभ्रंश भाषेच्या बरोबरच जे कांहीं अल्पस्वल्प बंगाली वाङ्मय लिहिले गेले तेच बंगाली भाषेचे प्राथमिक प्राचीन रूप मानले जाते.

## चर्यागीतिका:—

सर्वच देशातील साहित्याचा उगम काव्यात झालेला आहे. असे रवींद्र-नाथांनी म्हटले आहे. हे जर खरे, तर बंगाली साहित्याचा जन्मही काव्यरूपाने झाला हे सांगायला नको.

उपरोक्त दोन शतकांच्या दरम्यानच्या काळात बंगालमधे बौद्ध सहजिया संप्रदाय आणि शैवयोगी नाथपंथी सिद्धाचार्य यांचा प्रभाव होता. त्या सिद्धाचार्यांना मंत्रतंत्रादी उपासनेचे मार्ग पसंत नव्हते. वास्तविक जीवनाशी निगडीत अशा सहजसुलभ धर्मउपासनेचे ते प्रणेते होते.

"किंतोमंते किंतो तंते किंतो रे झाणवखाने" (चर्या ३४)

असे त्यांचे तत्त्व होते. त्या सांप्रदायिक मंडळींनी वरील अबहट्ठ भाषेत मुख्यत्वेकरून आपले धार्मिक विचार ग्रंथित केले; तरीपण सर्वसामान्यांच्या भाषेतही कांही धार्मिक गीतें त्यांनीं लिहिली होती. सिद्धाचार्यांनी लिहिलेल्या त्या धार्मिक गीतिकाच बंगाली साहित्याचे सर्वाहून पुरातन रूप होत असे मानले जाते. त्या गीतिकांना 'चर्यागीतिका' म्हणतात आणि त्यांत बौद्ध धर्मातील गूढ अध्यात्मिक वर्णनें व तत्त्वज्ञान, परमार्थ इत्यादींचे वर्णन आढळते.

बंगालमधे प्रचलित असलेल्या 'मयनामतीर गान' (मयनामतीचे गाणे) मधे संबंधित संप्रदायाची गुरुपरंपरा मत्स्येंद्रनाथ (मीननाथ), गोरखनाथ (गोरख्नाथ), जालंधरिपाद (हाडिपा) कृष्णपाद (कानुपा, कान्हूपा) अशी असल्याचे आढळते. लुईपाद हा आदि सिध्दाचार्य मानला जातो. त्याकाळी या चर्यागीतिका गायकीत म्हणण्याच्या हेतूने लिहिल्या गेल्या होत्या हे त्या त्या गीतिका कोणत्या रागरागिणीत म्हणाव्यात त्याचा निर्देश असल्याने उघड होते. उदा० राग-गबडा (चर्या २,३), राग-गुंजरी (चर्या ५,२२), राग-भैरवी (चर्या १२, १६, १९, ३८)

चर्यागीतातील अध्यात्मिक गूढ तत्त्व गुरुकडूनच समजाऊन घेतले पाहिजे असे अनेक चर्यागीतात म्हटले आहे. उदा०

दिढ करिअ महासुह परिमाण
लुई भणई गुरु पुच्छई जान ॥ (चर्या १)

(महासुखाचे परिमाण दृढ कसे करावे ते गुरुला विचारून, समजाऊन घेतले पाहिजे, असे लुईपाद सांगतो.)

एत काल हॉउ अच्छिल स्वमोहे
एबे मइ बुझिल सद्गुरु बोहे ॥ (चर्या ३५)

(इतके दिवस मी मोहजालात गुरफटला होतो, आता सद्‌गुरुंच्या कृपेने मला ते समजले आहे.)

गूढ अध्यात्माचा नमुना म्हणून पुढील चर्या पाहण्यासारखी आहे. २८ व्या चर्येंत मोहाविष्ट शबर (चित्त) आपल्या पत्नीला चुकून परस्त्री समजतो. कारण तिने आपल्या वेषभुषेने स्वतःचे स्वरुप झांकले होते. परंतु शबर बेचैन झालेला पाहून शबरीने (नैरात्म्याने) आपली ओळख दिली आणि आपला स्वीकार करण्यास त्याला विनंति केली.

उमत सबरो पागल शबरो मा कर गुली गुहाडा तोहौरि
नीअ वरिणी णामे सहज सुंदरी ॥

(अरे वेड्या शबरा, चुकू नकोस, बावचळू नकोस; मी तुझीच गृहिणी सहजसुंदरी आहे)

कांहीं कांहीं चर्यागीतात काव्यसौंदर्य आणि आनंदाचा ध्वनी फारच सुंदर उमटलेला आढळतो. उदा०

उंचा उंचा पावत तँहि वसई सबरीबाली
मोरंगि पिच्छ परहिण सबरी गिबत गुंजरी माली ।
नाना तरुवर मौलिलरे अगणत लागेली डाली
एकेली सबरी ए वन हिंडइ कर्णकुंडल वज्रधारी ॥

(उंचउंच पर्वतावर व्याधबालिका राहते. ती मोरपिसे ल्याली असून तिने कानांत गुंजफुलांच्या माळा घातल्या आहेत.....नाना वृक्ष मोहरले, त्यांच्या शाखा आभाळाला भिडल्या; कर्णकुंडलवज्रधारिणी शबरी एकटी या वनात शोधत फिरते आहे.)

**बाउल:—**

बाराव्या शतकानंतर चर्यागीतांची जागा 'बाउल' सांप्रदायाने घेतली असे म्हणायला हरकत नाही. 'बाउल' हे सिद्धाचार्यांचेच वारसदार असले तरी ते सहजमार्गावरील वाटसरू होते. ज्याला सहजपणे धर्म म्हणता येईल, जाणता येईल, त्या धर्माची साधना करणे हे बाउल सांप्रदायाचे 'सहज-साधन' होते. सहजिया सिद्धाचार्यांच्या कांहीं चर्यागीतातून सुस्पष्ट झालेल्या सहज-धर्माचेच संकीर्तन बाउल सांप्रदायाने पुढे चालविले. बाउल म्हणतात:—

बलुक बलुक बलूक
यार मने या लय गो !
आपना पथेर पथिक आमि
कार बा करि भय गो !

(ज्याला जे वाटेल ते त्याने खुशाल म्हणावे, मी आपला स्वतःच्या वाटेने जाणारा वाटसरु आहे—मला कोणाचे काय भय ?)

तसेंच 'तुझे आहे तुजपाशी' हे बाउल सांप्रदायाचे तत्त्व त्यांच्या नानाविध गीतात आढळून येते.

तोरि भितर अतल सागर
तार पाइलि ना मरम
तार नाइ कुल किनारा, शास्त्रधारा,
नाइ धरम कि करम ।

(तुझ्यातच अतल सागर आहे, त्याचे मर्म तुला कळलेले नाही. त्या सागराला किनारा नाही, शास्त्र, धर्म, कर्म कांहिही नाही—तो असीम आहे.)

यारे आकाश पाताल खुँजे मरिस
एइ देहे से रय....

(ज्याला आकाश पाताळ धुंडित फिरतोस, त्याचे वास्तव्य याच देहात आहे)

भजनेर मूल एइ नरवपु देह
(भजनाचे मूलस्थान हा नरदेहच आहे)

देहरुपी पिंजऱ्यात वास्तव्य करणाऱ्या आत्म्याला बाउल सांप्रदायिक मंडळी 'अचिन पाखी' (अनोळखी पक्षी), 'मनेर मानूष' (मनातील माणूस), 'साँइ' (सखा), 'दीनदरिद्री साँइ', 'गरजी' 'प्रभु' अशा नानाविध नावांनी आळवीत असतात.

## लोक-गीतेः—

जयदेवानंतर बंगाली काव्य-साहित्यावर ज्याचा फार मोठा परिणाम झाला तो म्हणजे मिथिलेचा कवि विद्यापति होय. परंतु, विद्यापतिसंबंधी लिहिण्यापूर्वी बंगाली लोकसाहित्याबद्दल थोडक्यात लिहिणे आवश्यक आहे.

भारतातील इतर सर्व प्रांतांप्रमाणेंच बंगालमधेंही लोकसाहित्य अति-प्राचीन काळापासून चालत आलेले आहे. परंतु ते अलिखित, तोंडी चालत आलेले असल्याने त्या साहित्याचा लिखित यादीत समावेश नाही. त्याची निर्मिती कधी झाली, त्यात भर कसकशी पडत गेली याचाही मागोवा लागणे शक्य नाही. अर्थातच त्या लोकसाहित्याचे संशोधन, संग्रह आणि संकलन बंगालमधे झालेले आहे. त्यावर थोर विद्वानांचे विवेचन प्रबंधादिही प्रसिध्द झालेले आहेत. एवढे खरे की, बंगालमधील सर्व जिल्ह्यातून, तेथील परिस्थिति व रीतिरिवाजानुसार नानाविध लोकवाङ्मय फार पुरातन काळापासून अस्तित्वात आहे. त्या लोकसाहित्यात त्या त्या विभागातील मानवी स्वभाव, रीतिरिवाज व सामाजिक परिस्थिति यांचे सहजसुंदर चित्रण आढळते.

प्रत्येक वर्षाच्या अखेरीस बंगालमधे, बहुतेक सर्वच ठिकाणी, तीन दिवस सूर्योत्सव साजरा केला जातो. त्याला 'गाजन' असे म्हणतात. सांप्रत त्याला 'शिवेर गाजन' (शिवाचे गाजन) असे नाव पडले असून त्या उत्सवात म्हटली जाणारी गीते मोठी मार्मिक आहेत. सरल मनाच्या बंगाली शेतकऱ्याला वाटते की, शिव स्वतः जसा दरिद्री, निराधार आहे त्याने साराचा सारा शेतकरीसमाज तसाच दरिद्री करून टाकला आहे. शिवाच्या मनात असेल तर तो शेतकऱ्याचे हे दारिद्र्य दूर करु शकेल.

पँटेते भात नाइ, ओ शिव, गोलाते नाइ धान,
कि दिया बाँचाबो, ओ शिव, छेल्यापिल्यार जान ।
ओ बुढा शिव, दया करो ॥
परणे नेता नाइ, ओ शिब, बरजे नाइ पान,
कि दिया राखि बो, ओ शिब, माइया लोकेर मान ।
ओ बोका शिब, दया करो ॥

(पोटात भात नाही, अरे शिवा कोठारात भात नाहीं, मुलाबाळांचा जीव कशाने जगवू? अरे म्हाताऱ्या शिवा, दया कर. नेसायला वस्त्र नाही, पानमळ्यात पाने नाहीत, स्त्रियांचा मान कशाने राखु? अरे भोळ्या सांबा, दया कर.) अशी गमतीदार कीतितरी गीते आहेत.

आपल्याकडील 'ये रे ये रे चांदा' किंवा 'चांदोबा चांदोबा भागलास कां' सारख्या

आयरे आय चाँदमामा टी दिये जा,
चाँदेर कपाले चाँद टी दिये जा—

(ये रे ये रे चांदोबा तीट लावून जा, माझ्या बाळरुपी चंद्राच्या कपाळी तीट लावून जा) लहान बालकांच्या गीतांपासून स्त्रियांच्या तोंडी रूळत असलेली गीते, शिवपार्वतीमधील रूसव्या-फुगव्यांसंबंधी गीते असा बंगाली लोकगीतांचा बहुरूपी बहर आहे.

बंगाली अंगाई गीतांचा प्रकार आगळाच आहे. त्यांच्याकडे अंगाई गीताला म्हणतात ' घुम ( झोंप ) पाडानि गान ' बाळाला झोपायला लावणाऱ्या अमूर्त मावशा, आत्या कल्पिलेल्या आहेत. त्या जणू कांहीं येऊन बाळाच्या डोळ्यांच्या पापण्यांवर अलगद् बसतात आणि बाळाचे डोळे झोपेने मिटले जातात.

घूम पाडानि माशिपिशि (आत्या) मोदेर बाडी एशो,
खाट नाइ पालंग नाइ खोकार-खुकूर चोख पेते बोशो ॥

( झोपायला लावणाऱ्या मावशी आत्या आमच्या घरी या; आमच्या घरी खाट नाही, पलंग नाही, बाळाच्या पापण्या अंथरुन बसा. ) अशा तऱ्हेची अंगाई गीते वाचून, ऐकून आपल्याला मोठी मौज वाटते. या पुस्तकात अशा शिशुगीतांचे, लोकगीतांचे कांहीं नमुने दिलेले आहेत.

लोकसाहित्यातील गद्य वाङ्मयही बंगालमधे असेच पुरातन काळापासून चालत आलेले आहे. ते रूपकथा, उपकथा इत्यादि नावानी प्रचलित आहे. पिढ्यान् पिढ्याचे आजोबा किंवा आजीबाई आपल्या नातवंडाना त्या कथा सांगत आलेल्या आहेत. त्यांच्याभोवती कोंडाळे करून बसून मुले त्या ऐकत आलेली आहेत. कै. दक्षिणारंजन मजुमदार यांनी तशा कथा संग्रहित करून, त्या जशा सांगितल्या जात तशा ग्रामीण जिव्हाळ्याच्या रसाळ भाषेत संकलित केल्या आणि ' ठाकुरमार झुलि ' ( आजीबाईचा झोळणा ), ' ठाकुर-दादार झोला ' इत्यादी नावांनी पुस्तकरूपाने प्रसिध्द केलेल्या आहेत. कै. दक्षिणारंजनांच्या लोक-रुपकथांच्या पुस्तकांच्या शंभराव्या महोत्सवी आवृत्या देखील निघाल्या इतकी ती पुस्तके लोकप्रिय आहेत. दक्षिणारंजन यांच्या एका पुस्तकातील कथा ' कांचनमाला–कांकणमाला ' या पुस्तकात मुद्दाम मराठी वाचकांसाठी घातलेली आहे. रवींद्रनाथांनी दक्षिणा-रंजनांच्या एका पुस्तकाला लिहिलेली सुरेखशी प्रस्तावना अवश्य वाचण्यासारखी आहे. स्वतः रवींद्रनाथांनीं बंगाली लोकसाहित्यावर लिहिलेले पुस्तक त्या साहित्याचे नानाविध पैलू चमकदारपणे नजरेंत भरवितात. आशुतोष भट्टाचार्य यांचें बंगाली लोकसाहित्याचे खंड तसेच मननीय आहेत.

## उदासीन काळ:—

बंगाली साहित्याच्या इतिहासात तेरावे शतक आणि चौदाव्या शतकाचा अर्धा भाग मोठ्या उदासीनतेचा गेला. बाराव्या शतकाच्या अखेरी अखेरीस पूर्व भारतात तुर्की लोकांच्या स्वाऱ्या सुरु झाल्या. महम्मद-बिन्-बख्तियारने बंगालवर स्वारी केल्यापासून शे-दीडशे वर्षेपर्यंत बंगालमधे धर्मवेड्या तुर्की लोकांनी इस्लाम धर्माच्या प्रसारासाठी जी विध्वंसक लीला, लुटालूट चालू केली होती, तिच्या परिणामी बंगाली जनतेच्या काळजात एक प्रकारची भीति उत्पन्न झालेली होती. ती भीति पुढे कित्येक वर्षे बंगाल्यांच्या मनांत घर करुन राहिलेली होती, हे सतराव्या शतकात लिहिल्या गेलेल्या रमाई पंडितांच्या 'शून्य पुराणा'तील पुढील धार्मिक गाजनातील उताऱ्यावरून लक्षात येईल.

देऊल देहारा भांगे गो-हाडेर धाय
हाते पुंथि करया यत देयाली पलाय ।
भालेर तिलक यत पुंछिया फेलिल
धर्मेर गाजने भाई यवन आईल ॥
देऊल दोहारा यत छिल ठाँई ठाँई
कय करि पाडे तारे ना माने दोहाई ॥

(साधारणपणे संदर्भाने शब्दसादृश्याने या काव्याचा अर्थ लक्षात येण्यासारखा आहे. यत=जितका, की, कें.) अशी बंगालमधे चौदाव्या शतकात अवस्था असल्याने, ती साहित्यनिर्मितीला फारशी अनुकुल नव्हती.

## विद्यापति:—

खि. स. च्या मध्यावर समसुद्दीन इलियस शाह याने बंगालमधे स्वतंत्र सुलतानीं राज्याची स्थापना केल्यानंतर तेथे सुखस्वास्थ्य 'चरण चाली'ने गृहप्रवेश करू लागले. ज्ञानसाधना, साहित्य-उपासना यांचा काळ परत आला. पाल आणि सेन राजांच्या प्रमाणेच समसुद्दीन इलिअस शाहच्या कारकीर्दी-

पासून बंगालमधे पुन्हा ज्ञानी, गुणी, कवि, साहित्यिक यांना राजाश्रय लाभु लागला.

पंधराव्या शतकाच्या शेवटी राज्यावर आलेल्या हुसेन शाहच्या कर्मचारी वर्गात बरेच कवि आणि पंडित होते. त्यांत कविशेखर विद्यापति विशेष प्रख्यात होते. वास्तविक विद्यापति हे मिथिलेचे कवि. मिथिलेत विस्फी नावाच्या गावी तेथील ठाकुर घराण्यात विद्यापतिंचा जन्म झाला. त्यांच्या जन्मकाळाची निश्चित माहिती मात्र उपलब्ध नाही. त्यांचे घराणे पंडितांचे. मिथिलेच्या अनेक राजांच्या राजसभेचे विद्यापति सदस्य आणि सभाकवि होते. त्यांची काव्ये मैथिली भाषेत रचली गेली असली तरी मैथिली आणि बंगाली या दोन भाषांमधे बरेचसे साम्य असल्याने बंगाल्यांना मैथिली भाषा समजत असे आणि मैथिली लोकांना बंगाली समजत असे. म्हणूनच, बंगालचे जयदेव मिथिलेत, आणि मिथिलेचे विद्यापति बंगालमधे आदरणीय ठरले; बंगाली लोकांच्या मनांत, बंगाली साहित्य-सृष्टीत विद्यापतींचे आसन अढळ बनले गेले. श्री. चैतन्यदेवांना विद्यापतींची राधाकृष्णलीला विषयक पद्ये अतिशय आवडत असत, असे म्हणतात. खि. स. च्या सोळाव्या शतकापासूनच बंगाली पदावलींवर विद्यापतींचा विशेष प्रभाव पडल्याचे आढळून येते. रवींद्रनाथांनीं विद्यापतींच्या 'भरा भादर, माह भादर, शून्य मंदिर मोर' इत्यादि कित्येक पद्यांना आपल्या आवडीचे सूर लावून बंगाल्यांची मने रंजविलीं आहेत. विद्यापतींचीं शिवबंदन, शिवमहात्म्यपर गीतेंही बंगाली लोकांना विशेष प्रिय झालेली आहेत.

या प्रमाणे, जयदेव, विद्यापति या कवीपासून प्रेरणा घेऊन प्रभावित होऊन बंगाली काव्यधारा पुढे प्रवाहित राहिली.

जयदेव, विद्यापति यांच्या पावलावर पाऊल ठेऊनच जणू कांहीं बंगालमधे 'कृष्णकीर्तन'कार बडूचंडीदास अवतरले. बडूचंडीदास यांचे 'श्रीकृष्णकीर्तन' हे काव्य वंगीय काव्यसृष्टीतील एक महनीय पर्व ठरलेले आहे. बडूचंडीदास हे वर्षाऋतूचे कवि मानले गेले आहेत. त्यांच्या काव्यात वर्षाऋतुची फारच

सुंदर वर्णने आढळतात. आपल्या काव्याच्या अखेरीस चंडीदासांनी चैतन्योत्तर पदकर्त्यांप्रमाणेच प्रेमाला अध्यात्मिकतेच्या तेजाने उजाळलेले आहे. राधेच्या प्रेमाचे त्यांनीं केलेले वर्णन रूपक असून भक्त आणि परमेश्वर यांच्या मिलनाची आंतरिक ओढ त्यांत सुस्पष्ट झालेली आहे. येथे एका गोष्टीचा उल्लेख करणे जरुर आहे. कृष्णकीर्तनकार चंडीदास आणि पदावलीकार चंडीदास असे दोन वेगळे चंडीदास बंगालमधे होऊन गेले. बडूचंडीदास श्री चैतन्यदेवांच्या अगोदरचे आणि पदावलीकार चंडीदास चैतन्यांचा जन्म झाल्यानंतरचे या दोन चंडिदासांच्या बाबतीत केव्हां केव्हां गल्लत केली जाते.

## काव्याची दोन युगें:—

वास्तविक बडूचंडीदासांपासून बंगाली काव्याचे एक नवे युगच सुरू झाले. बंगाली काव्याची दोन महत्त्वाची, अविस्मरणीय अशी युगे मानली गेली आहेत. पहिले, श्री चैतन्यदेवांच्या अवतारानंतरचे अर्धे शतक; आणि दुसरे महाकवि माइकेल मधुसूदन दत्त यांचे 'मेघनाद वध' काव्य प्रसिद्ध झाल्यापासून रवींद्रनाथांचे देहावसान होईतो ऐंशी वर्षेपर्यंतचे. आणि आता चालू असलेले आधुनिक तिसरे युगच म्हटले पाहिजे.

पहिल्या युगात बडूचंडीदासांच्या मागोमाग बंगालमधे अनुवाद साहित्याचा काळ आला. खि. स. पंधराव्या शतकात बंगालमध्यें जी शांतता निर्माण झाली, स्वास्थ्य निर्माण झाले त्याच्या परिणामी काव्याला अनुकुल असे वातावरण निर्माण झाले. संस्कृत रामायण, महाभारत, भागवत इत्यादि ग्रंथांचा अनुवाद करण्याची तेव्हां एक हौसच जणू कांहीं निर्माण झाली.

हे अनुवाद दोन प्रकारचे झाले. कांहींनी मूळच्या ग्रंथांचे शब्दशः भाषांतर केले. या प्रकारचे भाषांतर रूक्ष, मूळ जसेच्या तसे ठेवण्याच्या प्रयत्नात ग्रंथांचे मौलिक गुण गमावणारे असे झाले. दुसऱ्या प्रकारचे अनुवाद विशेष सरस झाले. कारण त्यात मूळच्या ग्रंथांचे अंधानुकरण नव्हते. तर कवीच्या कल्पना, काव्य, भाव हे आपल्या भाषेत स्वतंत्रपणे उतरविण्याचा प्रयास होता. तसे करत असतांना मूळ साहित्यात आवश्यकतेनुरूप कोठे

कोठे थोडे फार फरकही केले होते; आणि आवश्यकतेनुरूप थोडे फार पदरचे नवे वाङ्मयही घातले होते. अनुवादात मूळ काव्याचा आत्मा, जोम आणि सौंदर्य अबाधित राखायचे असल्यास शब्दाला शब्द ठेवून भागत नाही तर मूळच्या भाषेचा डौल आपल्या भाषेत उतरविण्यासाठीं परिस्थितीनुरुप तसा फेरफार करावा लागतो हे त्या अनुवादकारांनीं जाणले होते. ही अनुवाद काव्ये अधिक लोकप्रिय झाली.

## कृत्तिवास—

या दुसऱ्या प्रकारच्या अनुवाद साहित्यात पहिलेच नाव कृत्तिवासांच्या रामायणाचे घ्यावे लागते. कृत्तिवासी रामायण हे प्राचीनतम बंगाली अनुवाद-काव्य गणले गेले आहे. त्या रामायण ग्रंथाने बंगाली मनाची इतकी पकड घेतली कीं, तो ग्रंथ अस्तित्वात येऊन चारशेहून अधिक वर्षे होऊन गेली, तरी कृत्तिवासांची स्मृति बंगाल्यांच्या मनात सदाबहारी राहिलेली आहे. रवींद्रनाथांनी म्हटल्याप्रमाणे अभिजात काव्याची लक्षणे ‘ दूरवर्ती ’, किंवा सततचा भविष्यकाळ आणि अपार पसरलेला मानवी समाज लक्षात घेऊन लिहिलेले काव्य ’ कृत्तिवासी रामायणाला लागू असल्याने ते काव्य मानवा-मानवात आणि युगा-युगात अभेद्य प्रीतीचे ‘ भावबंधन ’ साधू शकले. मूळ ग्रंथात पुढे बराच प्रक्षिप्त आलेला आहे. ख्रि. स. १८०३ मधे श्रीरामपूर येथील मिशनऱ्यांनी सर्वात लोकप्रिय ठरलेले कृत्तिवासी रामायण मुद्रित केले. तसे करताना त्यांना जो ग्रंथ हाताशी उपलब्ध झाला, तोच त्यानी छापून टाकला. वेगळाले ग्रंथ ताडून पाहून, खऱ्या-खोट्याची शहानिशा संबंधित मिशनरी करीत बसले नाहीत. त्यामुळे, आता बंगालमधे प्रचलित असलेल्या कृत्तिवासी रामायणात प्रक्षिप्त भाग बराच आढळतो.

कृत्तिवासानंतरही रामायणाचे आणखी अनेक अनुवाद झाले. श्रीचैतन्यानंतरच्या युगात, ज्याला बंगालीत ‘ परचैतन्ययुग ’ म्हणतात त्या काळात ते अनुवाद झाले.

रामायणाप्रमाणेच भागवताचेही जे अनेक अनुवाद झाले त्यांत मालाधर बसु यांचा अनुवाद संस्मरणीय होय.

## कृष्णमंगल शाखा :—

प्राचीन बंगाली साहित्याचे एक वैशिष्ट्य असे होते की, एकाच विषयावर एकामागून एक अनेक कवींनी काव्ये लिहिली. त्यामुळें, तो काव्याचा विषय त्या काळातील प्रमुख काव्यविषय ठरून, ती एक काव्याची विशिष्ट शाखाच ठरून जात असे. त्याप्रमाणे, भागवताच्या आधारावर श्रीकृष्णाविषयी वरचेवर जी काव्ये लिहिली गेली, ती 'श्रीकृष्णमंगल शाखा' या नावाने बंगालमधे रूढ झाली. खि. स. च्या १६ व्या शतकात लिहिल्या गेलेल्या श्रीकृष्णमंगल काव्याच्या नुसत्या नामावलीने त्या शाखेची कल्पना येण्यासारखी आहे. (१) यशोराम खान यांचे कृष्णमंगल काव्य, (२) महाप्रभु श्री चैतन्यांचे एक अनुयायी गोविंद आचार्य यांचे श्रीकृष्णमंगल, (३) श्रीचैतन्यांचे एक भक्त परमानंद गुप्त यांचे कृष्णस्तवावली; (४) रघुनाथ पंडित भागवताचार्यांचे श्रीकृष्णप्रेम तरंगिणी काव्य, (५) द्विज माधव आचार्य यांचे कृष्णमंगल, द्विज माधवांनी आपले काव्य लिहिताना जणू कांहीं श्रीचैतन्यांना साक्षीला समोर ठेवले होते. द्विज माधवांनी म्हटले आहे 'चैतन्य चरणधुलि शिरे विभूषण करि द्विज माधव रसभाषे' (चैतन्यदेवांची पायधूळ शिरी घेऊनच द्विज माधव काव्यरस लिहितो आहे) (६) सोळाव्या शतकातील भागवतावर काव्ये लिहिणाऱ्या कवींपैकी कवि शेखर राय हे सर्वश्रेष्ठ मानले गेले आहेत. त्यांच्या काव्याचे नाव होते 'गोपाल विजय' बडूचडीदास यांच्या कृष्णकीर्तनातील आख्यानाशी गोपाल विजयातील आख्यानाचे बरेच सादृश्य असल्याचे दिसते. (७) दुःखी शामदास यांचे गोविंद मंगल व भागवत काहिनी; (८) कवि कृष्णदास यांचे श्रीकृष्ण मंगल काव्य.

पुढे १७ व्या आणि १८ व्या शतकातही कृष्णलीलेवर बरीच काव्ये रचली गेली.

रामायणाप्रमाणेच महाभारताचेही नानाविध अनुवाद बंगाली लोकांनीं केले. कोणी समग्र महाभारत अनुवादिले, तर कोणी महाभारतातील विशिष्ट

भागावर काव्ये रचिली. ती सारी काव्ये भारत-पांचाली किंवा बंगाली महाभारत या नावानीं प्रसिद्ध आहेत.

## बंगाली साहित्यात श्रीचैतन्य देव :--

पंधराव्या शतकात बंगाली साहित्याला राजाश्रय लाभल्याने ते साहित्य समृद्ध होऊ लागले होतेच. तेवढ्यात बंगाल्यांच्या सुदैवाने श्रीचैतन्यदेवांसारखा महापुरुष त्यांच्या प्रांतात अवतरला. त्यामुळे बंगाली साहित्य आणखी डामडौलाने वाढीस लागले. चैतन्यदेव शके १४०१ ख्रि. स. १४८६ च्या फाल्गुन पौर्णिमेस नवद्विप येथे जन्मले. श्रीचैतन्यांचा जन्म बंगाली साहित्याच्या इतिहासातील एक फार महत्त्वपूर्ण घटना आहे. आतापर्यंत बंगाली लोक शिक्षण, संस्कार, संस्कृति यांसाठी परस्थावर अवलंबून होते. आता त्यांच्यासाठी श्रीचैतन्य आपल्याबरोबर नवी प्रेरणा घेऊन आले. इतःपर बंगाली लोकांना दुसऱ्यांच्या तोंडाकडे पहात बसावे लागले नाहीं. शिक्षण, संस्कृति इत्यादि बाबतीत श्रीचैतन्यानी बंगाली लोकांना स्वावलंबी, स्वतंत्र बनविले. त्यांच्यात अपूर्व अशी एक आध्यात्मिक जागृति झाली जणु साक्षात्कारच झाला. बंगालने आपली ती अध्यात्मिक वाणी आत्मबलावर. आत्मिक विश्वासावर बंगालच्या बाहेरही पोहोचती केली. चैतन्यदेवांनी घोषिले होते, "मला आणि माझ्या सेवकांना जातपात नाही." त्यांचे विश्वबंधुत्व अकृत्रिम प्रेम यांनीं बंगालच्या जीवनात नवा उत्साह, नवी आशा यांचे बीजारोषण केले. अशा तऱ्हेने चैतन्यदेवांबरोबर बंगाली साहित्यात नवे युग अवतरले. इंग्रजी साहित्यात राणी एलिझाबेथची कारकीर्द जशी गौरवपूर्ण ठरलेली आहे, तोच गौरव बंगाली साहित्यातील चैतन्ययुगाचा आहे. म्हणूनच, बंगाली साहित्यांत चैतन्ययुग विशेष संस्मरणीय ठरलेले आहे.

श्रीचैतन्यांनी माणसाला मानवी-प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. श्रीचैतन्यांच्या जीवनावर बंगाली साहित्याचे तीन प्रवाह निर्माण झाले. (१) त्यांची जीवन-कथा व त्यांच्या विश्वप्रेमाच्या संदेशावर आधारित; तो प्रवाह 'चरित शाखा' किंवा 'जीवनी काव्याची शाखा' या नावाने परिचित आहे (२) चैतन्यांच्या

जीवनातील 'राधा-भाव-विलसित लीला वैचित्र्या'वर आधारित; ती पदावली शाखा. (३) चैतन्यदेवांच्या भक्तिपर जीवनावर आधारित; गौरचंद्रिका शाखा.

श्रीचैतन्यदेव हयात असतानाच त्यांच्या जीवनावर काव्य रचना सुरू झाली होती. ती पुढे बरीच वर्षे चालू राहिली. ती काव्ये 'चैतन्यमंगल'; 'चैतन्यभागवत'; 'चैतन्यचरितामृत'; 'गौरांगविजय' अशा नावांनी प्रसिद्ध आहेत.

**वैष्णव पदावली :--**

गीति कविता या वंग साहित्यातील एक गौरवपूर्ण प्रमुख अंग ठरलेल्या आहेत. सोळाव्या शतकात वैष्णव कवींनी गीति कवितांची विशेषत्वाने जोपासना केली. त्याकाळीं राधाकृष्णलीला या विषयावर गीति कविता लिहिण्याचा जसा कांहीं मोसमच आला होता. महाप्रभु चैतन्यांच्या रुपाने राधा-कल्पना भावाचाच संपूर्ण आविष्कार झाला असे बंगाल्याना वाटे व वाटते. त्यामुळे राधेचे वर्णन-शब्दचित्रण करतांना वैष्णव कवींनी श्रीचैतन्यांचा आदर्श दृष्टिसमोर ठेवला होता. श्रीचैतन्यदेवासंबंधीं गीति-काव्ये, चैतन्यांच्या पारिषदवर्गांच्या महात्म्याविषयी गीति, वैष्णव महंताच्या भजन गीति, रागात्मिका गाणी, इत्यादि लिहिण्याची तेंव्हां जणु कांही एक लाटच आलेली होती.

त्या वैष्णव गीतिकाच 'पदावली' या नावाने बंगालीमधे ओळखल्या जातात; आणि त्यांचे वंग साहित्यात स्वतंत्र असे मानाचे स्थान ठरले गेलेले आहे. खरे म्हणजे. चैतन्यपरवर्ती युगात खऱ्या अर्थाने 'पदावली' साहित्याची प्राणप्रतिष्ठा झाली.

मयूरेर कंठ देखि कृष्णस्मृति हैला ।<br>
प्रेमावेशे महाप्रभु भूमिते पडिला ॥

(मयुराचा कंठ पाहून श्रीचैतन्यांना श्रीकृष्णाचे स्मरण झाले, आणि

कृष्णप्रेमाने मोहित होऊन महाप्रभुनी भूमीवर लोटांगण घातले.—
(चै. चरिता मृत–मध्य–१७ वा परिच्छेद)

पदावलीतील राधेची स्थितिही अशीच आढळते.

ये करे कानूर नाम तार धरे पाय।
सोनार पुतली येन माटिते लुटाय॥— चंडीदास

(जो कोणी कन्हैयाचे नाव घेईल त्या प्रत्येकाच्या ती पाया पडते आणि सोन्याची पुतळी जणु कांहीं मातीवर (धरणीवर) लोळण घेते)

अशा तऱ्हेची चैतन्य–कृष्ण–राधिका यांच्या एक भक्ति–भावाची वर्णने चैतन्य चरितामृतात ठायी ठायी आढळतात.

वैष्णव पदावलीकार इतके झाले, की त्यांची नामावली देण्याची देखील आवश्यकता नाहीं मात्र, त्यातील प्रमुख चंडीदास याचा उल्लेख करणे अगत्याचे आहे. कारण, पूर्वी उल्लेखिलेल्या बडूचंडीदास आणि हा पदकर्ता चंडीदास वेगळे असल्याचे मागेच सांगितले आहे.

**मुसलमान कवी :—**

श्रीचैतन्यानंतर आलेल्या पदावलीच्या खळखळत्या प्रवाहात अनेक मुसलमान कवींच्या काव्याच्याही तेजस्वी लहरी आपले लक्ष वेधून घेतात. आतांवर जवळ जवळ शंभरावर मुसलमान पदावलीकार कवींची माहिती उपलब्ध झालेली आहे. कौतुक असे की, हे सर्व मुसलमान कवी वैष्णव धर्माने मोहित झाले होते, श्रीकृष्णाच्या प्रेमलीलाविषयक वाङ्मयानी भारून गेले होते, बंगालमधील चैतन्याच्या प्रेमधर्माने ते वेडे झाले होते. इतके की त्यांनीं लिहिलेल्या राधाकृष्ण–लीलाविषयक पदावली वाचीत असता त्या कोणी निष्ठावंत वैष्णव कवींनीच लिहिल्या असाव्यात असे वाटते. बंगाली साहित्यात मुसलमान कवींनी घातलेली भर स्थळ संकोचामुळे त्या कवींच्या काव्याचे नमुने वा त्यांचे अर्थ येथे देता येणे शक्य नाहीं परंतु अयाहिद, अकबर साह,

सय्यद अकबर अलि, सय्यद आलाओल, उम्मर अलि, कबीर, कबीर शेख, गरीब खाँ, नशीर मामुद, मुसा, लालन, लाल मामुद, सैयद मर्तुजा, रहिमुद्दीन सर्फ तोला या कवींची नावे विसरता येण्यासारखी नाहीत.

## मंगलकाव्ये :—

पदावलींच्या पाठोपाठ बंगालमधे मंगलकाव्यांची लाट आली. निरनिराळ्या कवींनी धार्मिक बैठकीवरून देवदेवतांची जी स्तुती-स्तोत्रे गायिली, लिहिली, ती 'मंगलकाव्ये' त्या मंगल काव्यांचा हेतू देवादिकांचे महात्म्य संकीर्तन आणि पूजा प्रचार हा होता. समाजात प्रचलित नसलेल्या पूजा अस्तित्वात आणणे आणि त्या देवादिकांच्या शक्तिसंपन्नतेची जनतेला जाण करून देणे हे कार्य मंगलकाव्याना साधायचे होते. त्याचबरोबर पूजेसाठी आवश्यक असलेले देवादिकांचे गुणगान स्तुतीस्तोत्रे उपलब्ध करून देणें हेही कार्य मंगल काव्यानी केले. मंगलकाव्यांचे दोन भाग कल्पिले आहेत. (१) लौकिक देवदेवतांचे लीलामहात्म्य वर्णन (२) पौराणिक कथांवर आधारलेली मंगलकाव्ये. पैकी पहिल्या भागात चंडीमंगल, मनसामंगल, षष्टीमंगल, सीतलामंगल इत्यादींचा समावेश होतो. आणि दुसऱ्यात शिवमंगल, सूर्यमंगल दुर्गामंगल, भवानीमंगल कमलामंगल, गंगामंगल इत्यादि येतात.

ब्रह्मा आणि नारदाच्या उपदेशाने श्रीगणेशाच्या सहाय्याने व्यासांनी महाभारत लिहिले. देवांच्या आदेशाने होमरने काव्यनिर्मिति केली. स्वप्नातील आदेशाने केडमन कवि झाले या आख्यायीका प्रसिद्ध आहेत. त्याचप्रमाणें बंगाली मंगलकाव्यांच्या बहुतेक कवींना देवीने स्वप्नात येऊन काव्यरचनेचा आदेश दिला असे त्यांच्या बहुविध काव्यात म्हटलेले आहे.

उदा. विजय गुप्तांचे पद्मपुराण मनसादेवीच्या आदेशाने लिहिले गेले; भारतचंद्रांचे अन्नदामंगल कालीदेवीच्या आदेशाने लिहिले गेले, रुपराम चक्रवर्ती यांचे षष्ठीमंगलही देवीनेच लिहायला सांगितले.

" निशिशेषे चैत्रमासे बुधवारदिने ।
गीत रचिबारे देबी कहिला स्वप्ने ॥

बहुतेक मंगल काव्यातील नायक–नायिका शापभ्रष्ट देव–देवता; अनेक दु:खकष्ट भोगल्यानंतर देवांची त्यांच्यावर कृपा होऊन त्या दु:ख क्लेश मुक्त झालेल्या आहेत.

चैतन्यांच्या पूर्वीच्या मंगलकाव्यात संस्कृतचा प्रभाव अधिक होता. चैतन्यांच्या नंतरच्या काळात लिहिल्या गेलेल्या मंगलकाव्यात अलंकारादि बेतानेच वापरलेलें आहेत.

## शाक्त पदावली :---

बंगाली पदावलीचे दोन भाग आहेत. वैष्णव आणि शाक्त. शाक्त पदावलीचे आदिकवि चोविस परगणा जिल्ह्यातील कुमारहट्ट, किंवा, हालिशहर नावाच्या गावचे रामप्रसाद सेन. भारतचंद्रानी ज्या काळी 'अन्नदामंगल' काव्य लिहिले त्याचकाळी, म्हणजे इ. स. च्या १८ व्या शतकात शाक्त पदावलीची उत्पत्ति झाली. रामप्रसादांचे घराणे शक्तिचे उपासक होते. म्हणून त्यांनीं अस्तित्वात आणलेल्या व बंगालमधे त्या धरतीवर पुढे कित्येक कवींनीं लिहिलेल्या पदावलींना 'शाक्त पदावली' असे नांव पडले. रामप्रसादानी 'श्यामा संगीत', 'आगमनी' (दुर्गा देवीच्या आगमन स्वागताची गीतें), आणि 'विजयागीते' लिहून पुढील अनेक कवींना नव्या वळणाची दीक्षा दिली. रामप्रसादानंतर पुष्कळ कवींनी श्यामा संगीत, आगमनी आणि विजया गीतें लिहून कीर्ति मिळवली. आधुनिक काळातले, किंवा बंगाली काव्याच्या परिवर्तन युगातले मधुसूदन दत्त, नवीनचंद्र सेन, गिरीशचंद्र घोष यांनी देखील रामप्रसादांचे अनुकरण केले.

शाक्त पदावलीत भक्ति प्रीतित परिणत झालेली आहे. वैष्णव पदावली-प्रमाणें शाक्त पदावलीतही परमेश्वराचे अस्तित्व, नाते आत्म्याशी कल्पिलेले आहे. मर्त्य मानवांच्या अनुभूति, आशा-आकांक्षा, दु:ख-कष्ट, शोक-संताप यांनीं शाक्त पदावलीकारांची संवेदनाशील मने हालली आणि त्यांनीं तद्रूप काव्यनिर्मिति केली असे दिसते.

शाक्त पदावलीच्या कवींना मूर्तिपूजा मान्य नव्हती; त्यातील व्यर्थता त्या कवींच्या काव्यात ठिकठीकाणी नमूद करून ठेवलेली आहे. रामप्रसाद म्हणतातः—

मन तोर एत भाबना केने
एकबार काली बले बसरे ध्याने
जाँकजमके करले पूजा, अहंकार हय मने मने ।
तुमि लुकिये तारे करले पूजा जानबे ना रे जगज्जने ॥
धातू पाषाण माटिर मूर्ति, काज कि रे तोर से गठने ।
तुमि मनोमय प्रतिमा गडि, बसाव हृदि पद्मासने ॥

( मना, तूं इतका कसला विचार करतो आहेस? एकदा कालीदेवीचे नाव घेऊन ध्यानाला बैस. डामडौलाने, गाजावाजाने पूजा केली तर मनोमन अहंकार उत्पन्न होतो. मुकाट्यानें, गुप्तपणे पूजा केली तर जगाला कळणार नाही. धातू, पाषाण माती इत्यादींच्या मूर्ति कशासाठी तूं घडवतोस? तू मनात परमेश्वराची प्रतिमा उभी कर आणि तिची हृदयपद्मासनावर प्रतिस्थापना कर. )

जगाचे पालन, संरक्षण, जोपासना करणाऱ्या आदिशक्तीला नैवेद्य करण्यातला वेडेपणाही रामप्रसादांच्या पदावलीत स्पष्ट व्यक्त झालेला आहे.

जगत्‌के खाओयाच्छेन जे मा सुमधुर खाध नाना,—
ओरे कोन् लाजे खाओयाते चास ताँय,
आलोचाल आर बूटभिजाना ।
जगत्‌के पालिछेन जे मा,
पशु-पक्षी कीट नाना
ओरे केमन करे दिते चास बलि,
मेष महिष आर छागलछाना ।

( जी माउली साऱ्या जगाला नाना तऱ्हेचे सुमधुर खाद्य खाऊ घालते. तिला तांदुळ ( बिन उकडे ) आणि वाटाणे-भिजाणे खाऊ घालण्याचा का

प्रयत्न करतोस ? जी जगातल्या नानातऱ्हेचें पशु-पक्षी कीटक यांची जोपासना करते आहे; तिच्यापुढे म्हशी, शेळ्या, कोंकरू यांचे बलिदान कसचे करतोस ?)

वैष्णव पदावलीत पुत्राच्या विरहानें व्याकुळ झालेली यशोदा आपले मानसिक अस्वास्थ्य बोलून दाखवते, तशी 'आगमनी' गाण्यांत 'उमेला' फार दिवस न पहायला मिळाल्याने माता मेनका बेचैन झालेली आढळते.

'ना हेरी तनया मुख हृदय विदरे' यात तिची मनस्थिति व्यक्त झालेली आहे. तसेच कन्येला माहेरी आणण्यासाठीं गिरिराणी मेनका गिरिराजांना आर्जवून सांगते.

कबे याबे गिरिराज आनिते गौरी।
आकुल हयेछे प्रान देखिते उमारे हे ॥

(गिरिराज गौरीला माहेरी आणण्यासाठी कधीं जाणार? उमेला पाहण्यासाठी जीव कसा उतावीळ कासावीस झाला आहे.)

शाक्त कवींच्या त्या नानाविध भक्तिमूलक आणि उदात्त अध्यात्मिक भावगीतांना कसली तोड नाही, असें बंगाली लोकांना वाटते.

**शिवायन :—**

आणखी एका विशिष्ट गीतिकाव्याचा उल्लेख करायला हवा. तो म्हणजे शिवायन. शिवाला शेतकरी, गृहस्थधर्मी समजून लिहिलेली गीतें सूर्योत्सवाच्या वेळी कशी म्हटली जातात, त्याचा उल्लेख पूर्वी आलेला आहे. खि. स. च्यां १५ व्या शतकापूर्वीच तसली शिवदेवासंबंधीची गाणी लिहिली जात होती, पूर्वोलिखित मनसामंगल चंडीमंगल आदि मंगलकाव्यांच्या प्रारंभी शिव-कहाणी वर्णिलेली आहे. त्या काव्यातील शिव वैदिक रूद्रदेव नाही, किंवा पौराणिक महादेव नाही, तर तो आदर्श किसान आहे, आदर्श पति आहे. शून्य-पुराणातही शिवमहात्म्य आहे. शिवायनातील शिव गरिब गृहस्थ कल्पिलेला आहे.

पार्वतीने त्याच्यापाशी हातातील ‘शाँखा’ (बंगालमधील सुवासिनी हातात शंखाच्या पाटल्या घालतात कधीं त्या सोन्यानें मढविलेल्या असतात व त्यावर कलाकुसरही असते) साठीं हट्ट केला असता त्याने उत्तर दिले आहे, “बाप बटे बडलोक, बलतारे गिया” (तुझा बाप श्रीमंत आहे त्याच्यापाशी जाऊन माग.)

पूर्वीच रूढ असलेल्या शिवगीताना ख्रि. स. च्या १७ व्या शतकात शिवायनाचे मूर्त स्वरुप लाभले. १७ व्या शतकातील ‘कवि चंद्र’ आणि ‘रामकृष्णदास यांची शिवायन काव्ये प्रसिद्ध आहेत. १८ व्या शतकातील रामेश्वर चक्रवर्ती यांच्या सुप्रसिद्ध शिवायनात शेतकऱ्याच्या घरातील हंसणी खेळणी, रूसणी-फुगणी, आशा-आकांक्षा, आनंद आणि दुःखे या सर्वांचे चित्रण साध्या सो‌या भाषेत केलेले आहे. अलंकारादिकांचे अवडंबर नसलेल्या या शिवायनात मानवी मनाचे सरस दर्शन घडते.

## नाथ साहित्यः—

मध्य युगातील बंगाली साहित्यापैकी आणखी एक संस्मरणीय साहित्य म्हणजे नाथ साहित्य. अतिप्राचीन काळापासून बंगालमधे जो शिव-उपासक योगी संप्रदाय होता, त्याने स्थापन केलेल्या धर्माला नाथधर्म म्हणत. बंगालमधे बुद्ध धर्माचा प्रसार झाला, तेव्हां बौद्ध धर्म आणि शैव धर्म यांच्या समन्वयाने एक नवाच धर्म अस्तित्वात आला. त्याचे नाव पडले नाथ धर्म. नाथ धर्माच्या संप्रदायाचे योग महात्म्य नाथ साहित्यात वर्णिलेले आहे. तसेच योगाच्या शक्तीने दुःखे कशी जिंकावीत आणि मृत्यूवर विजय कसा मिळवावा इत्यादि वर्णनेही नाथसाहित्यात आहेत. नाथ साहित्याचे दोन प्रकार आहेत. १) गोरख-विजय (यात मीननाथ, गोरखनाथ यांच्या कथा आहेत.) २) मयनामतीर गान किंवा गोपीचंद्रेर गान.

या दोनही साहित्यातील कथा मोठ्या मनोरंजक आहेत. नाथधर्माचे गुरू मीननाथ आणि त्यांचे शिष्य गोरखनाथ हे दोघेही सिद्धपुरुष होते. अलौकिक शक्तीचे अधिकारी होते. गोरखविजयात त्यांच्या कथा सांगितल्या आहेत.

दुसरे सिद्धपुरुष 'हाडिया' यांची कथा आहे. मेहेरकुल नावाचे एक राज्य होते. तिलकचंद्र नावाचा राजा तेथे राज्य करत होता. तिलकचंद्राला एक कन्यारत्न होते. तिचे नाव शिशुमति. सिद्धा हाडिपा राजवाड्यात गेले असतांना त्यांच्या थोरवीनें शिशुमति भारली गेली आणि हाडिपा यांची शिष्या बनली. तेव्हां तिचे नाव झाले मयनामती. पुढे लग्नाचे वय झाल्यावर मयनामतीचे माणिकचंद्र नावाच्या राजाशी लग्न झाले. ती सारी व पुढची मनोरंजक कथा मयनामतीर गानात आहे. दोनही काव्ये ग्रामीण कवीनी लिहिलेली असल्याने त्यात भाषेचा बाह्यिक साज-शृंगार नाही.

प्राचीन वंग काव्यातील आणखी एक उल्लेखनीय प्रकार म्हणजे 'मयमनसिंग गीतिका' नावावरूनच त्या गीतिका मयमनसिंग जिल्ह्यातील असल्याचे स्पष्ट आहे. त्या गीतिकांचे स्वतंत्र वैशिष्ट्य असल्याने त्यांच्या नामनिर्देशावाचून बंगाली पुरातन काव्याचा इतिहास अपुरा राहील.

## परिवर्तन युग :—

भारतचंद्र, रामप्रसाद यांच्याबरोबरच बंगाली काव्यसाहित्याचे पहिले युग संपले. माइकेल मधुसूदन दत्तांबरोबर नवे आधुनिक, किंवा ज्याला बंगाली काव्याचे परिवर्तन युग म्हणतात ते दुसरे युग सुरू झाले. खि. स. १७६० मधे भारतचंद्र परलोकवासी झाले. मधुसूदनांच्या काव्यप्रकाशाचा काळ १८५८ चा. या दीर्घ मध्यंतरात, जुन्या नव्याचा सांधा जुळविणारे म्हणून प्रख्यात असलेले, एकमेव ईश्वरचंद्र गुप्त बंगाली काव्यजगतात तेजस्वीतेनें चमकले दुसरे नाव रंगलाल बंद्योपाध्याय यांचे घेता येईल. त्याकाळाला बंगाली काव्यप्रेमी युग-संधीकाल म्हणतात त्या संधिकालाचे नाव 'कविवाल्या'चे युग असे पडलेले आहे. कवि-गान, पांचाली-गान, टप्पा-गान इत्यादि काव्यांचे ते युग १८ व्या शतकाच्या मध्यापासून १९ व्या शतकाच्या जवळजवळ मध्यापर्यंत व्यापलेले होते.

भारतचंद्रानीं विशिष्ट राजसभेतील दरबारी मंडळींच्या मनरंजनासाठी 'विद्यासुंदर' काव्य लिहिले होते. त्या काव्याची अभिरुची घटकाभर

करमणुकीची, म्हणजे बेताच्याच पातळीची होती. तीच अभिरुची भारत-चंद्रांच्या नंतर बंगाली साहित्यसृष्टित बरीच वर्षे रेंगाळत राहिली होती. तरजा झुमुर, आखडाई, हाफ-आखडाई इत्यादि कविगानाचेच आणखी प्रकार होते.

सुरुवातीस कविगान गीति-काव्यांचेच अनुकरण असे. राधाकृष्णांचे प्रेम हा त्यांचा विषय. दोन संचात उत्तर-प्रत्युत्तरांच्या रुपाने ती गीते म्हटली जात. पहिला संच येऊन प्रारंभीच गुरुवंदन व देवीवंदनपर गीते गायी नंतर दुसरा संच येऊन पहिल्याला उत्तर म्हणून निराळी गुरुवंदना व देवी वंदनपर गीते म्हणे. पुढे 'सखी-संवाद' गीत; नंतर 'विरह'; आणि शेवटी 'खेऊड' किंवा 'खेडू' बंगाली कविवाल्यांच्या या काव्यगायनाच्या प्रकारा-वरून आपल्याकडील लोकनाट्यातील (तमाशा) अध्यात्मिक स्तवन वंदनाचा भाग सवाल-जवाब इत्यादींची आठवण होते. कविवाल्यांचे युग बंगाली काव्य साहित्यात अंधःकार युग समजले गेले असले, तरी कविगानांचे सुवर्णयुग होते असे म्हणतात. राम बसु, हरु ठाकुर निताई बैरागी, एंटनी फिरंगी, यासारखे 'कविवाले' त्याकाळात होऊन गेले. कविवाल्यातील सर्वश्रेष्ठ होते राम बसु. ते कविसंचाला गाणी रचून देत. 'कविंची लढाई,' म्हणजे सभेत गाण्याच्या रुपाने प्रश्नोत्तरांची प्रथा राम बसुनींच अस्तित्वात आणली. एरवी कविवाल्यांची काव्ये तेथल्या तेथे तोंडी रचून म्हटली जात. त्या उत्स्फुर्त पद्यात अधुनमधून खऱ्या काव्याची प्रचिती येत असे.

## मधुसूदन दत्त :—

होता करता कविवाल्यांचा काळ संपला आणि बंगाली काव्य क्षितीजा-वर महाकवि मधुसूदन दत्त उदित झाले. आपल्या तेजस्वी प्रतिभेने त्यांनी साऱ्यांचे लक्ष वेधून घेतले. काव्याचे ठराविक वळण बदलून मधुसूदनांनी बंगाली काव्याला नवे, प्रभावी वळण दिले. बंगाली काव्याचा कायापालट झाला. तेव्हां बंगाल पाश्चात्य भाषा, पाश्चात्य साहित्य, पाश्चात्य शिक्षण व संस्कृति, सामाजिक रीती-रिवाज यांच्या झगझगाटाने दिपलेला होता; पाश्चात्य शिक्षण-संस्कृतिच्या प्रभावाने बंगालमधील रूढी, परंपरा बदलत

होत्या; बंगाल्यांची अभिरुची व आशा-आकांक्षा यांना नवी दिशा दिसू लागली होती; नवा उत्साह निर्माण होऊ लागला होता. याच सुमारास पाश्चात्य साहित्याच्या प्रभावाने आधुनिक बंगाली गद्य साहित्य जीव धरु लागले होते, ताकदीने वाटचाल करू लागले होते. परंतु, काव्यसाहित्यावर तसे संस्कार अद्याप झालेले नव्हते. भारतचंद्र आणि त्यांचे अनुकरण करणाऱ्या कविवाल्यांनी बंगाली काव्यसृष्टीत जो गढूळपणा आणला होता, तो नाहिसा करण्याचा ईश्वरचंद्र गुप्त यांनीच तेवढा प्रयत्न केला होता. परंतु, त्यांच्या यमक-अनुप्रास आणि शाब्दिक लीलांनी त्याकाळच्या इंग्रजी-शिक्षित, नव्या युगातील नव्या मनांचे यथोचित समाधान होईना. रंगलाल यांनी सुशिक्षीत बंगाली मनाला तृप्त करण्याचा आपल्यापरीने प्रयत्न केला. परंतु तेही फारसे यशस्वी होऊं शकले नव्हते.

बंगाली काव्याच्या अशा विपत्काली मधुसूदन दत्त समोर आले. निसर्गदत्त प्रतिभा आणि आत्मप्रत्यय यांच्या बळावर त्यांनीं पाश्चात्य साहित्यातील बहुविध सामग्री संग्रहित केली. आणि बंगाली काव्यसाहित्याला नवे रूप, नवा जोम आणला. पौर्वात्य आणि पाश्चात्य यांच्या सुंदर समन्वयाने मधूसूदनानी बंगाली काव्यसाहित्यात खरोखरीचे परिवर्तन घडवून आणले. म्हणूनच, माइकेल मधुसूदन दत्त हे बंगाली काव्यजगताच्या परिवर्तन, किंवा, आधुनिक युगाचे प्रणेते गणले गेलेले आहेत.

बंगाली काव्यसाहित्यातील मधुसूदनांचा पहिला आहेर ‘तिलोत्तमा संभव’ काव्य. परंतु त्यांचे ‘मेघनादवध’च सर्वश्रेष्ठ ठरलेले आहे. मात्र त्या महाकाव्याचा आदर्श पौर्वात्य महाकाव्य नसून, पाश्चात्य *Epic* आहे. अर्थातच मधुसूदनांनी पाश्चात्यांचे ते अनुकरण केवळ बाह्यांगीच केलेले होते. अंतरंगी त्यांनीं कोणत्याही देशातील महाकाव्याचे अनुकरण केलेले नव्हते. त्यांचे स्वतःचे संस्कार आणि वैयक्तिक मनःप्रवृत्ति याच त्यांच्या काव्यात विजयी झालेल्या आहेत. मेघनाद वधानंतरची त्यांची ‘व्रजांगना’ व ‘वीरांगना’ ही श्रेष्ठ काव्ये वंगीय काव्यजगतात डौलाने नव्या साजशृंगाराने मिरविली.

आतापर्यंत ज्या ठराविक वृत्तात-छंदात बंगाली काव्ये लिहिली जात, ते छंद बदलून मधुसूदनानी नवे छंद बंगाली काव्यात आणले. त्यांचे मेघनाद वध 'अमित्र छंदा' चा उत्कृष्ट नमुना आहे. अमित्राक्षर छंद हा मिल्टनच्या *Blank verse* च्या पध्दतिचा आहे. बंगालीत पाश्चात्य धर्तीचे *Sonnet* (सुनीत) मधुसूदनानीच आणले. त्यांनी एका थोर बंगाली साहित्यिकांना (राजनारायण बसू यांना) एका पत्रात कळविले होते, *"I want to introduce Sonnet in to our language and some mornings ago I made following"*– आणि सोबत आपण रचलेले एक सुनीत त्यांनी पाठवून दिले होते. पुढे त्या पत्रात मधुसूदनानी म्हटले होते, *"What you say to this my good friend? In my humble opinion, if cultivated by men of genius, our sonnet in time would rival the Italian."*

थोडक्यात म्हणजे मधुसूदनांचे साहित्यिक व कविजीवन अल्पकालीन झाले, तरी त्यांनी बंगाली शारदेला केलेले भरघोस आहेर सदैव टवटवीत राहणारे आहेत.

मधुसूदन दत्तांच्या पाठोपाठ महाकाव्यें लिहून कीर्तिसंपन्न झालेले, परिवर्तन युगातील दुसरे कविवर्य म्हणजे, हेमचंद्र बंद्योपाध्याय, आणि नवीनचंद्र सेन. त्या उभय कविवर्यांचे बंगाली साहित्यातील दान फार महनीय असेच आहे. हाती मशाल घेऊनच त्यांनी जणु कांही बंगाल्यांना देशप्रीतिचा मार्ग दाखविला. बंगाली लोकात देशप्रेम जागृत करायला हेमचंद्र बंद्योपाध्याय व नवीनचंद्र सेन यांची काव्ये बरीचशी कारणीभूत झाली. हेमचंद्राच्या कांही व्यंगात्मक कविता बरीच वर्षे लोकांच्या तोंडी होत्या. बंगाली भाषेच्या परिपोषासाठी त्यांनी बऱ्याच पाश्चात्य कवींच्या कवितांचा सुंदर अनुवाद केला, रुपांतरे केली. त्यामुळे कांही नवीन काव्यप्रकार बंगालीत रुढ झाले. नवीनचंद्रांच्या काव्यात मानवाचा दैववाद झंकारलेला आढळतो.

'पराधीन स्वर्गवास हेत गरीयसी स्वाधीन नरकवास' म्हणणाऱ्या नवीनचंद्राना कोण विसरेल?

## रवींद्रयुग :—

उपरोक्त कवि-मंडल काव्य क्षितीजावर चमकत असतानाच बंगाली साहित्यसृष्टीचे युगपुरुष रवींद्रनाथ, बंगाली साहित्याचा ध्रुव तारा क्षितिजावर चमकू लागला होता. जीवनातील अशी एकही अनुभूति, एकही प्रत्यय, एकही कल्पना, की दृष्टी नसेल, ज्यावर रवींद्रांचे मनोवेधी काव्य नाही. त्यांच्या गीतांजलीने तर साऱ्या जगताला नवी दृष्टी दिली अथांग काव्य सागरात रवींद्रांच्या अगदी 'शिशु'पासून सर्वव्यापी सुदर सुंदर, मनावर कायमचे ठसे उमटविणारी रत्नें उधळलेली आहेत. नानाविध, नानारंगी, नानालहरींवर 'नृत्येर ताले ताले' (नृत्याच्या तालावर) त्यांची काव्ये विहरत आहेत. व्यासांप्रमाणेच 'रवींद्रोच्छिष्टम् जगत सर्वम्' असे म्हटल्यास ती अतिशयोक्ति न व्हावी' इतकी रवींद्रनाथांची अभिजात काव्यप्रतिभा सर्वव्यापी आणि झळकती आहे बंगाल भाग्यवान खराच म्हणून त्यांना जगव्यापी कीर्तिचे, जगत्‌वंद्य कवि रवींद्रनाथ लाभले ! अर्थातच आता ते एकट्या बंगालचे राहिलेले नाहीत, साऱ्या भारताचे आहेत, जगाचे आहेत. या संग्रहात रवींद्रनाथांच्या 'शिशु'पैकी कांहीं कविता आणि महाराष्ट्राला वंदनीय वाटावी अशी त्यांची 'शिवाजी उत्सव' ही कविता घातलेली आहे.

मधुसूदन ते रवींद्रनाथांच्या पर्यवसानाच्या काळापर्यंत झालेल्या, बिहारीलाल चक्रवर्ती, अक्षयचंद्र वडाल, देवेंद्रनाथ सेन आदिकरून आणखी कित्येक मान्यवंत कवींचा येथे समाचार घेता येणे शक्य नाही परंतु, त्यांचा हातभार लागला नसता तर बंगालि काव्यजगत कदाचित सुने भासले असते, इतके ते कवि वजनदार होऊन गेले हे नक्कीच. त्यापैकी कांहींच्या कविता ह्या पुस्तकात घातल्या आहेत त्यांवरून त्या कवीवर्यांच्या काव्यप्रतिभेची अल्पस्वल्प कल्पना येईल.

## चालू युग :—

आता, रवींद्रनाथांच्या कालीच पाऊले टाकू लागलेल्या चालू युगाचा प्रयोग सुरु आहे. या युगातील एकाद्याच विशेष प्रभावी कविचा नामनिर्देश

करता नाही. कारण सांप्रत बंगालमधे खूपच कवींचे राज्य चालू आहे कवि-संमेलनच जणु कांही. खोलीपेक्षा पसाऱ्याचे युग आहे हे. विषयाची विविधता असली, नाविन्य असले तरी, चिरंतन स्वरूपाच्या काव्यनिर्मितींचा हा काळ दिसत नाहीं. थोडक्यात म्हणजे, आजची मराठी काव्याची जी स्थिति-गति आहे, तीच बंगाली काव्याची आहे एवढें सांगितल्यानें आधुनिक म्हणजे चालु बंगाली काव्याची कल्पना येण्यासारखी आहे. पैकी कांही कविता या पुस्तकात घातलेल्या आहेतच.

# बंगाली गद्य

**गद्याचा आद्य नमुना :—**

बंगाली भाषेचा जन्म ख्रि. स. ९०० च्या सुमारास झाला असला तरी सन १७४३ पर्यंत कांहीं ऐतिहासिक कागदपत्रांखेरिज बंगालीत गद्य निर्मिति झालेली नव्हती. आणि जे ऐतिहासिक कागदपत्र, किंवा दस्तऐवज उपलब्ध आहेत, त्यांना कोणी गद्य साहित्य या सदरात घालत नाहीत. नमुन्यासाठी एक दोन ऐतिहासिक पत्रे या पुस्तकात घातलेली आहेत. त्यावरून त्याकाळच्या भाषेची कल्पना येण्यासारखी आहे. पैकी पहिले पत्र १५५५ मध्यें लिहिलेले आहे. महाराज नरनारायण यांचे पत्र ख्रि. स. १९०१ च्या २१ जूनच्या 'आसामवन्ति पत्रिके'त प्रथम प्रसिद्ध झालेले होते. नंतर उत्तर वंगीय साहित्य संमेलनाच्या तिसऱ्या अधिवेशनाचे अध्यक्ष माननीय पद्मनाभ भट्टाचार्य विद्या विनोद यांच्या भाषणात आले, ते त्या संमेलनाच्या अहवालात पुनर्मुद्रित झाले होते. दुसरे पत्र आसामवन्तिच्याच सन १९०१ च्या १ ऑगस्टच्या अंकात प्रसिद्ध झालेले होते.

सन १७४३ मधे पोर्तुगीज लोकांनीं लिसबन शहरात पहिला बंगाली गद्य ग्रंथ 'कृपार शास्त्रेर अर्थभेद' छापून प्रसिद्ध केला. म्हणून, ते वर्ष, म्हणजे सन १७४३, बंगाली गद्याच्या प्राणप्रतिष्ठेचे वर्ष मानले जाते. म्हणजे बंगाली भाषेच्या जन्मापासून उपरोक्त ग्रंथ प्रसिद्ध होईतो पर्यंतचा काळ,

८४३ वर्षें, बंगाली गद्याचे 'अंधेरे युग' मानले जाते. तरीपण बंगाली गद्याचा आदितम नमुना म्हणून चंडीदासाचे 'चैत्यरूप प्राप्ति' आणि रमाई पंडित यांच्या 'शुन्य पुराणा'तील 'बारमासि' वगैरे गद्यभागाकडे लक्ष वेधविले जाते. बंगाली विद्वज्जनांचा अंदाज आहे, की चंडीदास खि. स. १४०० च्या शेवटीं शेवटीं होऊन गेले आणि 'शून्य पुराण' १७ व्या शतकात लिहिले गेले. नमुन्यासाठीं 'चैत्यरूप प्राप्ति' आणि 'शून्य पुराणाती'ल एक दोन उतारे या पुस्तकात घातलेले आहेत. १८ व्या शतकातील गद्याचा नमुना म्हणून 'विक्रमादित्यचरित्रा'चा (सुप्रसिद्ध बंगाली इतिहास संशोधक सुनीति-कुमार चट्टोपाध्याय यांनीं ब्रिटिश म्युझियम मधून ज्या पत्राची नक्कल आणून प्रकाशित केली होती तें) कांहीं भागही या पुस्तकात मुद्दाम घातला आहे.

उपरोक्त 'कृपार शास्त्रेर अर्थभेद' हा ग्रंथ 'मनोएलद आस्सुंसाँओ' या पोर्तुगीज प्राद्री साहेबांनीं लिहिला होता. आणि तो रोमन लिपीत छापला गेला होता. याच मनोएल द आस्सुपंसाओ या पोतुगीज मिशनरी साहेबानी एक बंगाली शब्दकोश आणि बंगाली व्याकरणही तयार केले होते. अर्थातच ते दोनही ग्रंथ पोतुगीज भाषेत होते. आपल्या धर्मप्रचारकांना बंगालमधे गेल्यानंतर तेथील भाषा शिकता यावी आणि खिस्ती धर्मप्रसाराचे कार्य सुकर व्हावे या हेतूने ते ग्रंथ लिहिले गेले होते. म्हणजे, खिस्ती धर्मप्रसाराच्या उद्देशाने खिस्ती मिशनऱ्यांकडून प्रथम बंगाली गद्य ग्रंथ अस्तीत्वात आला हे उघड आहे.

**बंगाली गद्य आणि इंग्रज :—**

सन १७५७ मधे प्लासीची लढाई झाली, बंगालचा, भारताचा पराभव झाला आणि इंग्रजांचे पाय वंग भूमीवर रोवले गेले. 'तेव्हांपासून भारतीय राष्ट्र-यज्ञाचे उध्वर्यु झाले इंग्रज' या देशात राज्य करायचे, तर बंगाली भाषा चांगली शिकली पाहिजे; आणि ती तशी शिकायची झाली तर बंगालीत गद्य ग्रंथ लिहिले गेले पाहिजेत; हे त्या दूरदर्शि राज्यकर्त्यांनी ओळखले. त्यांना खिस्ती धर्माचाही प्रसार करायचा होता. आपले दोनही हेतू सुसाध्य करण्या-

साठीं इंग्रजांनीं श्रीरामपूर येथे मिशनची संस्थापना केली. बंगाली गद्य साहित्याच्या इतिहासाशी श्रीरामपूरच्या मिशनचे नाव आणि तिने केलेले कार्य कायमचे संलग्न झाले आहे.

त्या मिशनचे प्रमुख होते विल्यम केरी. आणि त्यांचे मुख्य सहकारी होते विल्यम वर्ड व जसुवा मार्शमन.

श्रीरामपूरच्या मिशनने पहिल्या प्रथम बायबलचा बंगालीत अनुवाद करून टाकला. त्या मंडळींनीं बंगाली शब्दकोश आणि व्याकरणही तयार केले. पहिले बंगाली वृत्तपत्रही त्या मिशनरी मंडळीनीच काढले. त्या मिशननेच बंगालमधे बंगाली पुस्तके छापून प्रसिद्ध करायला सुरवात केली. त्यांच्या मुद्रणयंत्रातून पहिली बंगाली पाठ्यपुस्तके छापून प्रसिद्ध झाली. चार्लस विल्किन्स नावाच्या साहेबांनीं सन १७७८ मधे सर्वाआधी बंगाली छपाईची अक्षरे (खिळे) तयार करवून घेतली. ते खिळे ज्यांनी तयार केले त्याचे नाव पंचानन. सदरहू पंचाननाचेच श्रीरामपूर मिशनच्या छापखान्यासाठी आणि कलकत्याच्या आणखी कांही मुद्रणयंत्रासाठी छपाईचे खिळे तयार केले होते.

इंग्रजानी छपाईची योजना व व्यवस्था करण्यापूर्वी बंगाली पुस्तके हाताने लिहिली जात होती. आता ती छापली जाण्याची सोय झाल्याने बंगाली गद्य-पद्य साहित्याचा प्रसार होण्याला मदत झाली. सन १८०० मधे इंग्रजांनी एक शिक्षणसंस्था स्थापन केली. अर्थातच ती काही सर्वसामान्यांसाठी नव्हती जे तरुण इंग्रज नोकरीसाठी इकडे येत त्यांना इकडील भाषा शिकविण्यासाठी ती शिक्षण संस्था अस्तीत्वात आलेली होती. तिचे नाव होते 'फोर्ट विल्यम कॉलेज' स्वतः विल्यम केरीसाहेब फोर्ट विल्यम कॉलेजमधे संस्कृत आणि बंगाली भाषा शिकवण्याचे काम करू लागले. पुढे ते त्या कॉलेजचे अध्यक्ष झाले. 'इतिहासमाला' आणि 'कथोपकथन' ही दोन बंगाली पुस्तके त्यांनीं लिहिली. संस्कृत हितोपदेशाचा बंगाली अनुवाद केला. बंगाली भाषेचे शिक्षण आणि प्रसारासाठी केरीसाहेबानी केलेले प्रयत्न व घेतलेले श्रम बंगाली गद्य साहित्याची भरभराट होण्यास कारणीभूत झाले.

फोर्ट विल्यम कॉलेजमधे केरीसाहेबानी जे बंगाली सहकारी जमविले होते, त्यात रामराम बसू, मृत्युंजय विद्यालंकार, चंडीचरण मुन्शी, राजीवलोचन मुखोपाध्याय आणि हरप्रसाद राय ही मंडळी प्रमुख होती. पैकी रामराम बसू यानी 'प्रतापादित्य चरित्र' लिहिले. मृत्युंजय विद्यालंकार यानी 'प्रबोध चंद्रिका', 'बत्तीस सिंहासन', 'राजावली' आणि 'हितोपदेश' ही पुस्तके लिहिली. चंडीचरण मुन्शीनी लिहिले 'तोता इतिहास' राजीवलोचन मुखोपाध्याय यांनी 'महाराजा कृष्णराजस्य चरित्रम' आणि हरप्रसादांनी 'पुरुष परीक्षा' ही पुस्तके लिहिली. बंगाली गद्य साहित्याची ही पहिली वहिली पुस्तके होत. पैकी चंडीचरण मुन्शी यांच्या तोता इतिहासातील एक उतारा मराठी वाचकांसाठी या पुस्तकात दिला आहे.

## राजा राममोहन राय :--

पाठ्यपुस्तकांव्यतिरिक्त बंगाली गद्य साहित्याचा प्रथम वापर राजा राममोहन राय यांनी केला. ते तर बंगाल आणि बंगालीच्या आधुनिकतेचे अग्रदूतच मानले गेलेले आहेत. राजा राममोहन राय यांचे नाव समाजसुधारक लोकशिक्षक आणि राजकीय जागृतीचे मशालजी म्हणून सर्वश्रुत आहेच. त्या कार्याबरोबरच बंगाली गद्यातून धर्म आणि तत्त्वज्ञान या विषयांचे केलेले विवेचन बंगाली गद्य साहित्याला बळकटी आणणारे झाले. वेदांतासारखा अवघड विषयही त्यांनी गद्यात मांडला. 'बंगाली गद्याला राजा राममोहन राय यांनी ग्रॅनाईटच्या पायावर उभे केले' असे त्यांच्याविषयी रवींद्रनाथांनी म्हटले आहे. म्हणूनच, राजा राममोहन राय याना 'बंगाली गद्याचे जनक' मानतात.

## विद्यासागर :—

राजा राममोहन राय हे बंगाली गद्य साहित्याचे जनक ठरले असले, तरी ईश्वरचंद्र विद्यासागर बंगाली गद्य साहित्याचे पहिले कलावंत होत. विद्यासागरांनी बंगाली गद्याला कलाकुशलतेने नटविले. त्यांच्यापूर्वी बंगाली गद्याला कळा नव्हती, सौंदर्य नव्हते. विद्यासागरानी भाषेला लालित्य, श्रुतिमाधुर्य

आणले. बंगाली गद्याला छंद निर्माण केला. छंदयुक्त डौलदार वाक्यरचना हे विद्यासागर महाशयांचे अनुपम कार्य होय.

विद्यासागरांच्यापूर्वी संस्कृतच्या अनुकरणाने जे बंगाली गद्य साहित्य लिहिले जाई, त्यांत दुर्बोधता; बंगाली आणि संस्कृतच्या मिश्रणाने तयार होणारी लांबच्या लांब अनियमीत बोजड वाक्ये; विरामचिन्हांचा अभाव; व त्यामुळे वाक्याचा प्रारंभ व शेवट न कळणे; परिणामी वाक्याचा अर्थबोध दुष्कर होणे; इत्यादी १९ व्या शतकाच्या प्रारंभी बंगाली गद्य साहित्यात असलेले दोषही विद्यासागरानी झाडून काढले व बंगाली गद्याची साफसफाई केली. थोडक्यात, बंगाली गद्यातील सर्व दोष नाहीसे करून त्याला कलात्मकशा उच्च पातळीवर बसविणारे आधुनिक सर्वश्रेष्ठ, प्रातःस्मरणीय सुपुत्र होत असे बंगाली लोक मानतात. विद्यासागराना त्यांच्या कार्यात सर्वतोपरी सहकार्य देऊन बंगाली गद्याची सेवा करणाऱ्या तत्कालीन सुप्रसिद्ध प्रबंधकार अक्षयकुमार दत्त यांचे नावही विसरून चालण्यासारखे नाही.

विद्यासागर यांनी बंगाली गद्य भाषेला जे वळण दिले ते कलासंपन्न असले तरी त्यात संस्कृत शब्दांचा वापर बराच असे. त्यांच्या भाषेला बंगालीत 'साधुभाषा' (भारदस्त भाषा) असे म्हणत. परंतु, त्यांच्या समकालीन साहित्यिकांनी किंवा त्यांच्या पाठोपाठ गद्य साहित्य लिहिणाऱ्यांनी विद्यासागरांची नक्कल करायला जाऊन जी जडजंबाल, रूक्ष भाषा लिहिण्याचा सपाटा सुरू केला त्या भाषेलाच उपरोधात्मक नाव पडले 'विद्यासागरी' भाषा. त्यामुळे तसल्या विद्यासागरी भाषेतून काही अवघड फक्कड काढून टाकणे व नवे सोपे गद्य घालणे त्या वेळच्या वाचकांना आवश्यक वाटू लागले. ती परिस्थिति लक्षात घेऊन पॅरिचाँद मित्र (टोपणनाव टेकचाँद ठाकुर) यानी त्यावेळेची गद्याची गरज भागविण्याचा प्रयत्न केला. श्रीमंतांची मुले भलत्या लाडाने कशी बिघडतात याचे सुरेख चित्र दाखविणारे पॅरिचाँद मित्र यांचे 'आलालेर घरेर दुलाल' हे पुस्तक त्या प्रयत्नाचे फळ होते. सदरहु पुस्तक बोली भाषेत लिहिले होते. दुसरे त्यांचे पुस्तक 'हुतम पँचार नक्षा' (हुतम घुबडाचे चित्र) हे व्यंगात्मक साहित्य होते–त्यावेळच्या प्रचलित

जीवनाचे जणु कांही छायाचित्रच होते. ही दोनही पुस्तके बंगाली गद्य साहित्याचा एक महत्त्वाचा टप्पा गणली गेली आहेत.

## बंकिमचंद्र :—

त्यानंतर 'बंगाली गद्याच्या जययात्रा रथाचे श्रेष्ट सारथी,' बंगाली आधुनिक कादंबरीचे जनक, व वंगीय कादंबरी साहित्याच्या चार दिक्पालांपैकी पहिले मानकरी महर्षि बंकिमचंद्र यांच्या श्रेष्ठ कादंबऱ्या एकामागून एक बाहेर पडून लोकाना चकित करू लागल्या. 'दुर्गेश नंदिनी' या बंकिमचंद्रांच्या पहिल्या ऐतिहासिक कादंबरीची भाषा थोडीफार 'विद्यासागरी'चे अनुकरण करणारी झाली असल्यास नवल नाही. पण पुढच्या त्यांच्या कादंबऱ्यांची भाषा विद्यासागरांचे गद्य आणि आललेर घरेर दुलाल यातील बोली भाषा यांच्या समन्वयाने स्वतंत्र बनली. बंकिमचंद्रांच्या हाताने बंगाली गद्याला सर्वप्रकारच्या भावना उत्कटतेने व्यक्त करण्याचे सामर्थ्य लाभले. कादंबऱ्यांबरोबरच त्यांनी प्रबंधादि साहित्य व हास्यरसात्मक साहित्यही लिहिले त्यांच्या 'कपालकुंडला' या कादंबरीतील एक प्रकरण या पुस्तकात संकलित केलेले आहे.

बंकिमचंद्रांचेच समकालीन रमेशचंद्र दत्त यांच्या नावाचा येथे मुद्दाम उल्लेख करायला हवा. रमेशचंद्र दत्त यांनी फक्त पाच सहाच कादंबऱ्या लिहिल्या. परंतु वेगळ्या प्रांतातील, त्याकाळी उपलब्ध असलेल्या, ऐतिहासिक कागदपत्रांचा अभ्यास करून त्यांनी लिहिलेल्या कादंबऱ्यांचे काही निराळे महत्त्व आहे. या पुस्तकात त्यांच्या 'महाराष्ट्र जीवन प्रभात' या शिवकालीन कादंबरीचे एक प्रकरण घातले आहे. त्यावरून रमेशचंद्रांच्या योग्यतेची मराठी वाचकाना कल्पना येईल.

## रवींद्रनाथ :—

बंगाली कादंबरी साहित्याचे दुसरे दिक्पाल रवींद्रनाथ. त्यांच्या कविहस्ताने बंगाली गद्याचा सर्वोत्तम विकास झाला. रवींद्रनाथांनी तर बंगाली

पद्य-गद्य दोनही विभागाची भली मोठी डोळे दिपविणारी, मन गुंगविणारी भव्य अशी खाशी स्वतंत्र दालनेच उभी केली. त्या दालनात कादंबऱ्या, कथा, नाट्य, प्रबंध, प्रवासवर्णने, पत्रावली, विनोदी लेख एक ना दोन, कित्येक चिरंतन तेजाने झळकणारे चौकोनी चिरे बसविले. बंगाली भाषेला सहजसोपे पण भारदस्त आणि दर्जेदार रूप आणून रवींद्रानी तिला सुंदर बनविली. आतावर महाराष्ट्राला रवींद्रनाथांचा बराच परिचय झाला असला तरी त्यांचे मूळचे, जमीनपातळीपासून आभाळाला भिडणाऱ्या उंचीपर्यंत झेप घेणारे कल्पनाशक्तिचे सर्वंकश साहित्य ज्यांनी वाचले असेल त्यानाच रवींद्रनाथ खऱ्या स्वरुपात दिसू शकतील, दिसत असतील.

## शरत्चंद्र :—

बंगाली कादंबरी साहित्याचे तिसरे दिक्पाल शरत्चंद्र चट्टोपाध्याय. ते तर एकादा पाण्याचा तुफान लोंढा यावा तसे हां हां म्हणता आले आणि बंगाल्यांच्या मनावर अशी कांही छाप टाकली, की, शरत्चंद्र हेच आपले मन बोलून दाखविणारे, संवेदनाशील, जिवाभावाचे साहित्यिक असे सर्वांना वाटू लागले. शरत्चंद्रानी बंगाली सर्वसामान्य जनतेचे जीवन मर्मज्ञतेने जाणले होते. त्यानी सर्वसामान्यांच्या लहान मोठ्या दुःखाना वाचा फोडली, त्यांचे यथार्थ जीवन त्यांनी सर्वांपुढे स्वच्छ उभे केले. “मला नेहमी वाटते की, प्रयत्नांतीही मला रवींद्रनाथांसारखे लिहिता येणार नाही” असे शरत्चंद्रानी आपल्या एका स्नेह्याना लिहिलेल्या पत्रात लिहिले असले तरी ‘बंगाल्यांचे अश्रु’ आणि ‘चित्तवेदना’ शरत्चंद्रांइतक्या आत्मीयतेने कोणी जाणल्या नाहीत. त्यादृष्टीने शरत्चंद्र हे नुसते कादंबरीकारच नव्हेत, तर फार मोठे समाजसुधारक होऊन गेले, असे म्हणावे लागते.

## ताराशंकर :—

भारतीय ज्ञानपीठाचे लाखमोलाचे पारितोषिक विजेते श्रीताराशंकर बंद्योपाध्याय हे चालू युगातील बंगाली कादंबरी साहित्याचे चौथे दिक्पाल होते. त्यानी शंभराहून अधिक पुस्तके लिहिली आहेत. ताराशंकरानी ग्रामीण

जीवन जवळून पाहिले आहे, त्या जीवनाशी ते समरस झालेले आहेत. म्हणूनच, त्यांच्या कादंबऱ्यातून गारूडी, मोटार मेकॅनिक, यात्रावाले, अशा सारख्यांचे जीवन सुरेख चितारले आहे. 'असे समाज सचेतन शिल्पी मन पूर्वी आढळले नव्हते' असे त्यांच्याबद्दल एका थोर विद्वानाने म्हटले आहे. पूर्वी बंगाली कादंबऱ्या व्यक्तिनिष्ठ असत, व्यक्तिजीवनावर लिहिल्या जात. ताराशंकरांनी व्यक्तिपेक्षा समाज श्रेष्ठ मानला आहे. समाजजीवन त्यांच्या कादंबऱ्यातून प्रकर्षाने व्यक्त झालेले आहे. त्यादृष्टीने ताराशंकरांच्या 'धात्री देवता', 'पंचदेवता', 'गणदेवता' इत्यादी कादंबऱ्या खऱ्या अर्थाने सामाजिक ठरतात. मानवी जीवनाचे सखोल दर्शन घेण्याचे त्यांचे वैशिष्ट्य बंकिमचंद्रांची आठवण करून देते. त्यांची शैली आणि भाषा मात्र निराळी आहे. कादंबरीची घडण आणि रसपरिपोष या दृष्टीने त्यांची 'कवि' ही कादंबरी सर्वश्रेष्ठ आहे. जन्म-मृत्युच्या खेळावर आधारलेल्या अजिबात भिन्न स्वरूपाच्या आणि सन १९५६ मधे साहित्य-अकादमीने पारितोषिक देऊन गौरविलेल्या 'आरोग्य-निकेतन' या कादंबरीतील एक प्रकरण या पुस्तकात घातले आहे. सदरहु आरोग्यनिकेतन वरून बंगालीत बोलपटही तयार झाला आहे.

## लघुकथा, नाटके इ. :—

कादंबरीच्या पाठोपाठ 'लघुकथा' या करवल्यांचा मान आला. परंतु, त्या सर्वांचा समाचार घेण्यापेक्षा, थोडक्यात असे म्हणता येईल की, बंकिमचंद्रांच्या वेळेपासून जी एकदा बंगाली गद्यरूपी वटवृक्षाची पाळे-मुळे सुजला सुफला वंगभूमीत खोल रूजली गेली, त्याचेच पर्यवसान लघुकथा, नाट्य-वाङ्मय, प्रबंध, विनोदी, उपरोधात्मक, तत्त्वज्ञानी वाङ्मय, प्रवास-वर्णने, पत्रें, चरित्रात्मक साहित्य अशा सर्व तऱ्हेच्या जोरदार शाखा, उपशाखा काळाबरोबर त्या वट-वृक्षाला फुटत राहिल्या, त्याच्या पारंब्या भुईत रोवल्या गेल्या; आणि अशा तऱ्हेने तो बंगाली गद्याचा वटवृक्ष कलकत्त्याच्या बोटॅनिकल गार्डन (एडन गार्डन) मधील प्रचंड बुंध्याच्या, अजस्र शाखा-पारंब्यांच्या पुरातन वटवृक्षाची आठवण करून देण्यासारखा भरभक्कम तयार झाला. थोडक्यात सांगायचे झाल्यास, कोणीही साहित्यप्रेमी रसिकांनी आपल्या आवडीप्रमाणे, उपरोक्त वट-

वृक्षाच्या हव्या त्या शाखेखाली, हवा तितका वेळ बसावे आणि मनमुरादपणें लेखन, वाचन, अभ्यास, मनन करावे, किंवा खुशाल विश्रांती घ्यावी.

त्या वटवृक्षाची आठवण झाली, की मला श्रमलेले मृगकुल जमून तरू-तली बसले असता त्यांच्या मनाला स्वर्गीय संगीताचा आनंद लाभावा म्हणून आपल्या सप्तसुरी बासरीतून निघालेल्या सुराशी नानाविध खेळ करीत उभा राहिलेल्या बालमूर्ती भगवान् श्रीकृष्णाच्या मनोज्ञ चित्राची अचूक आठवण झाल्याशिवाय राहातच नाही.

"के ना बाँशी बाए बडाइ कालिनी नइ कुले ।
के ना बाँशी बाए बडाइ ए गोठ गोकुले ॥"

(बडूचंडीदास)

त्याच बासरीचे अखंडपणे निनादत राहिलेले सूर अद्यापही कानात गुणगुणत असतात. त्याच वेळेला असेही वाटते की, पुन्हा एकदा आपणसुद्धा एडन गार्डनमधल्या त्या वटवृक्षाखाली जाऊन बसावे आणि साहित्य संगीताचे सूर ऐकाला मिळतील का ते पहावे! —एकाग्र चित्ताने ते साहित्य सूर नाहीच ऐकाला मिळाले, तर प्रार्थनेसाठी गुणगुणत रहावे 'बजाव कन्हैया बजाव बजाव मुरली – ही एक आस मनी उरली' पण तो वटवृक्ष हजार मैलाच्या अंतरावर राहिला आहे! तथापी साहित्य संगीतात रमून जाण्याची आशा अजू-नही माझ्या मनात टवटवीत आहे—आणि वाटते की, एक ना एक दिवस माझी ती आशा पुरी होईलच.

सौ. सरोजिनी कमतनूरकर

১

# ছেলেভুলানো ছড়া

১

আয় আয় চাঁদামামা টী দিয়ে যা।
চাঁদের কপালে চাঁদ টী দিয়ে যা॥
মাছ কাটলে মুড়ো দেবো,
ধান ভানলে কুঁড়ো দেবো,
কালো গরুর দুধ দেবো,
দুধ খাবার বাটি দেবো,
চাঁদের কপালে চাঁদ টী দিয়ে যা॥

২

আয় রে আয় টিয়ে,
নায়ে ভরা দিয়ে॥
না নিয়ে গেল বোয়াল মাছে।
তা দেখে দেখে ভোঁদড় নাচে॥
ওরে ভোঁদড় ফিরে চা।
খোকার নাচন দেখে যা॥

৩

খোকা আমাদের সোনা,
চার পুকুরের কোনা।
বাড়িতে সেকরা ডেকে মোহর কেটে
গড়িয়ে দেব দানা—
তোমরা কেউ কোরো না মানা॥

৪

দাদা গো দাদা শহরে যাও।
তিন টাকা করে মাইনে পাও ॥
দাদার গলায় তুলসী মালা।
বউ বরণে চন্দ্রকলা ॥
হেই দাদা তোমার পায়ে পড়ি
বউ এনে দাও খেলা করি ॥

৫

খোকা নাচে কোন্‌খানে।
শতদলের মাঝখানে ॥
সেখানে খোকা চুল ঝাড়ে।
থোকা থোকা ফুল পড়ে।
তাই নিয়ে খোকা খেলা করে ॥

৬

খোকা যাবে মাছ ধরিতে, গায়ে লাগিবে কাদা।
কলু বাড়ি গিয়ে তেল নেওগে, দাম দেবে তোমার দাদা ॥

৭

খোকা যাবে মোষ চরাতে, খেয়ে যাবে কি।
আমার শিকের উপর গমের রুটি, তবলা-ভরা ঘি ॥

৮

ধূলায় ধূসর নন্দকিশোর
ধূলা মেখেছে গায়।
ধূলা ঝেড়ে কোলে করো
সোনার জাদুরায় ॥

৯

খোকা এল বেড়িয়ে।
দুধ দাও গো জুড়িয়ে ॥
দুধের বাটি তপ্ত।

খোকা হলেন খ্যান্ত॥
খোকা যাবেন নায়ে।
লাল জুতুয়া পায়ে॥

১০

খোকা যাবে বেড়ু করতে তেলিমাগিদের পাড়া।
তেলিমাগিরা মুখ করেছে কেন্‌রে মাখনচোরা।
ভাঁড় ভেঙ্গেছে, ননি খেয়েছে, আর কি দেখা পাব।
কদমতলায় দেখা পেলে বাঁশি কেড়ে নেব॥

১১

পুঁটুমণি গো মেয়ে
বর দিব চেয়ে॥
কোন্‌ গাঁয়ের বর।
নিমাই সরকারের বেটা। পালকি বের কর্‌॥
বের করেছি বের করেছি ফুলের ঝারা দিয়ে।
পুঁটুমণিকে নিয়ে যাব বকুলতলা দিয়ে॥

১২

দোল দোল দোলানি।
কানে দেব চৌদানি॥
কোমরে দেব ভেড়ার টোপ।
ফেটে মরবে পাড়ার লোক॥
মেয়ে নয়কো সাত বেটা—
গড়িয়ে দেব কোমরপাটা॥
দেখ্‌ শত্তুর চেয়ে—
আমার কত সাধের মেয়ে॥

১৩

রাণু কেন কেঁদেছে।
ভিজে কাটে রেঁধেছে॥
কাল যাব আমি গঞ্জের হাট।

কিনে আনব শুকনো কাঠ ॥
তোমার কান্না কেন শুনি।
তোমার শিকেয় তোলা ননী।
তুমি খাওনা সারা দিনই ॥

১৪

পুঁটু যাবে শ্বশুর বাড়ী সঙ্গে যাবে কে।
ঘরে আছে কুনো বেড়াল কোমর বেঁধেছে ॥
আম কাঁঠালের বাগান দেব ছায়ায় ছায়ায় যেতে।
চার মিন্‌সে কাহার দেব পাল্কি বহাতে ॥
সরু ধানের চিঁড়ে দেব পথে জল খেতে।
চার মাগি দাসী দেব পায়ে তেল দিতে ॥
উড়কি ধানের মুড়কি দেব শাশুড়ি ভুলাতে ॥

১৫

বৃষ্টি পড়ে টাপুর-টুপুর নদী এল বান।
শিবু ঠাকুরের বিয়ে হল তিন কন্যে দান ॥
এক কন্যে রাঁধেন বাড়েন এক কন্যে খান।
এক কন্যে না খেয়ে বাপের বাড়ী যান ॥

১৬

বড়ো বউ গো ছোট বউ গো জলকে যাবি গো।
জলের মধ্যে ফুল ফুটেছে দেখতে পাবি গো ॥
কেষ্ট বেড়ান কূলে কূলে, তাঁত নিবি গো।
তারি জন্যে মার খেয়েছি, পিঠ দেখ গো ॥
বড়ো বউ গো ছোট বউ গো আরেক কথা শুন্‌সে।
রাধার ঘরে চোর ঢুকেছে চুড়োবাঁধা মিন্‌সে ॥
ঘটি নেয় না, বাটি নেয় না, নেয় না সোনার ঝারি।
যে ঘরেতে রাজা বউ সেই ঘরেতে চুরি ॥

১৭

আগ্‌ডুম বাগ্‌ডুম ঘোড়াডুম সাজে।
ঢাক মৃদং ঝাঁজর বাজে ॥

বাজতে বাজতে চলল ডুলি।
ডুলি গেল সে কমলাপুলি॥
কমলাপুলির টিয়েটা।
সুর্যিমামার বিয়েটা॥
আয় রঙ্গ হাটে যাই।
গুয়া পান কিনে খাই॥
একটি পান ফোঁপরা।
মায়ে ঝিয়ে ঝগড়া॥
কচি কচি কুমড়োর ঝোল।
ওরে খুকু গা তোল॥
আমি তো বটে নন্দ ঘোষ।
মাথায় কাপড় দে॥
হলুদ বনে কলুদ ফুল—
তারার নাম টগর ফুল॥

## ঘুমপাড়ানি

১৮

ঘুমপাড়ানি মাসি পিসি আমার বাড়ী এসো।
মেজ নেই মাদুর নেই, পুঁটুর (খোকার) চোখ পেতে বোসো॥
বাটা ভরে পান দেব, গাল ভরে খেয়ো।
খিড়কি দুয়ার খুলে দেব, ফুড়ুৎ করে যেয়ো॥

১৯

ঘুমপাড়ানি মাসি পিসি ঘুমের বাড়ি যেয়ো।
বাটা ভরে পান দেব, গাল ভরে খেয়ো॥
শান-বাঁধানো ঘাট দেব, বেসম মেখে নেয়ো।
শীতলপাটি পেড়ে দেব, পড়ে ঘুম যেয়ো॥
আম-কাঁঠালের বাগান দেব, ছায়ায় ছায়ায় যাবে।
চার চার বেয়ারা দেব, কাঁধে করে নেবে॥

দুই দুই বাঁদি দেব, পায়ে তেল দেবে।
উল্‌কি ধানের মুড়কি দেব নারেঙ্গা ধানের খই।
গাছপাকা রম্‌ভা দেব হাঁড়িভরা দই॥

২০

ঘুমপাড়ানি মাসি পিসি আমাদের বাড়ি যেয়ো।
খাট নেই, পালঙ্গ নেই, খোকার চোখে বসো॥
খোকার মা বাড়ি নেই, শুয়ে ঘুম যেয়ো।
মাচার নীচে দুধ আছে টেনে টুনে খেয়ো॥
নিশির কাপড় খসিয়ে দেব, বাঘের নাচন চেয়ো।
বাটা ভরে পান দেব দুয়ারে বসে খেয়ো॥
খিড়কি দুয়ার কেটে দেব ফুড়ুৎ ফুড়ুৎ যেয়ো॥

## গ্রাম্যছড়া

২১

তালগাছ কাটম বোসের বাটম গৌরী এল ঝি।
তোর কপালে বুড়ো বর আমি করব কী॥
টঙ্কা ভেঙে শঙ্খা দিলাম, কানে মদন কড়ি।
বিয়ের বেলা দেখে এলুম বুড়ো চাপদাড়ি॥
চোখ খাও গো বাপ মা, চোখ খাও গো খুড়ো।
এমন বরকে দিয়েছিলে তামাকখেগো বুড়ো॥
বুড়োর হুঁকো গেল ভেসে, বুড়ো মরে কেশে।
নেড়ে চেড়ে দেখি বুড়ো মরে রয়েছে।
ফেন গালবার সময় বুড়ো নেচে উঠেছে॥

২২

ডালিম গাছে পর্‌ভু নাচে।
তাক্‌ধুমাধুম বাদ্দি বাজে॥
আয়ী গো চিনতে পার?
গোটা দুই অন্ন বাড়॥

অন্নপূর্ণা দুধের সর।
কাল যাব গো পরের ঘর॥
পরের বেটা মারলে চড়।
কান্‌তে কান্‌তে খুড়োর ঘর।
খুড়ো দিলে বুড়ো বর॥
হেই খুড়ো তোর পায়ে ধরি
থুয়ে আয় গা মায়ের বাড়ি॥
মায়ে দিল সরু শাঁখা বাপে দিল শাড়ি।
ভাই দিলে হুড়কো ঠেঙা 'চল্‌ শ্বশুরবাড়ি'॥

২৩

যমুনাবতী সরস্বতী কাল যমুনার বিয়ে।
যমুনা যাবেন শ্বশুরবাড়ী কাজিতলা দিয়ে॥
কাজি ফুল কুড়তে পেয়ে গেলুম মালা।
হাত ঝুম্‌ঝুম্‌ পা ঝুম্‌ঝুম্‌ সীতারামের খেলা॥
নাচো তো সীতারাম কাঁকাল বেঁকিয়ে।
আলোচাল দেব টাপাল ভরিয়ে॥
আলোচাল খেতে খেতে গলা হল কাঠ।
হেথায় তো জল নেই ত্রিপূর্ণির ঘাট॥
ত্রিপূর্ণির ঘাটে দুটো মাছ ভেসেছে।
একটি নিলেন গুরুঠাকুর একটি নিলেন কে॥
তার বোনকে বিয়ে করি ওড়ফুল দিয়ে॥
ওড়ফুল কুড়তে হয়ে গেল বেলা।
তার বোনকে বিয়ে করি ঠিক দুপুর বেলা॥

২৪

জাদু, এ তো বড়ো রঙ্গ জাদু, এ তো বড়ো রঙ্গ।
চার কালো দেখাতে পার যাবো তোমার সঙ্গ॥
কাক কালো, কোকিল কালো, কালো ফিঙের বেশ।
তাহার অধিক কালো, কন্যে, তোমার মাথার কেশ॥

জাদু, এ তো বড়ো রঙ্গ জাদু, এ তো বড়ো রঙ্গ।
চার ধলো দেখাতে পার যাব তোমার সঙ্গ ॥
বক ধলো বস্ত্র ধলো, ধলো রাজহংস।
তাহার অধিক ধলো, কন্যে, তোমার হাতের শঙ্খ ॥
জাদু, এ তো বড়ো রঙ্গ জাদু, এ তো বড়ো রঙ্গ।
চার রাঙা দেখাতে পার যাব তোমার সঙ্গ ॥
জবা রাঙা, করবী রাঙা, রাঙা কুসুমফুল।
তাহার অধিক রাঙা, কন্যে, তোমার মাথার সিঁদুর ॥
জাদু, এ তো বড়ো রঙ্গ জাদু, এ তো বড়ো রঙ্গ।
চার তিতো দেখাতে পার যাব তোমার সঙ্গ।
নিম তিতো, নিসুন্দে তিতো, তিতো মাকাল ফল।
তাহার অধিক তিতো, কন্যে, বোন-সতিনের ঘর ॥
জাদু, এ তো বড়ো রঙ্গ জাদু, এ তো বড়ো রঙ্গ।
চার হিম দেখাতে পার যাব তোমার সঙ্গ ॥
হিম জল, হিম স্থল, হিম শীতলপাটি।
তাহার অধিক হিম, কন্যে, তোমার বুকের ছাতি ॥



# ২ | কৃতাঞ্জলি

## বিদ্যাপতি

(১৪শ-১৫শ শতাব্দি)

মাধব, হাম পরিণাম নিরাশা।
তুহুঁ জগতারণ দীন দয়াময়
অতএ তোহারি বিশোয়াসা॥
কত চতুরানন মরি মরি যাওত
ন তুয়া আদি অবসানা।
তোহে জনমি পুন তোহে সমাওত
সাগরলহরী সমানা॥
ভনয়ে বিদ্যাপতি শেষ শমন-ভয়ে
তুয়া বিনা গতি নাহি আরা।
আদি অনাদিক নাথ কহায়সি
ভবতারণ ভার তোহারা॥

□□

৩

# সীতার বিবাহ

## কৃত্তিবাস

(খৃঃ ১৫শ শতাব্দী)

গলে বস্ত্র দিয়া বলে জনক রাজন।
তব পুত্রে কন্যা দিয়া লইনু শরণ ॥
দুই রাজা উঠি তবে কৈল সম্ভাষণ।
কন্যা আন আন বলে যত বন্ধুগণ ॥
হেন বেশ ভূষণ পরায় সখীগণ।
যাহাতে মহিত হয় শ্রীরামের মন ॥
সখী দেয় সীতার মস্তকে আমলকী।
তোলা জলে স্নান করাইলা চন্দ্রমুখী ॥
চিরুণীতে কেশ আঁচড়িয়া সখীগণ।
চুল বান্ধি পরাইল অঙ্গে আভরণ ॥
কপালে তিলক আর নির্ম্মল সিন্দুর।
বালসূর্য সম তেজ দেখতে প্রচুর ॥
নাকেতে কেশর দিল মুক্তা সহকারে।
পাটের পাছড়া দিল সকল শরীরে ॥
চঞ্চল নয়ন কিবা কজ্জলের রেখা।
কামের সমান যেন গুণে যায় দেখা ॥
গলায় তাহার দিল হার ঝিলিমিলি।
বুকে পরাইয়া দিল সোনার কাঁচলি ॥
উপর-হাতেতে দিল তার স্বর্ণময়।
সুবর্ণের কর্ণফুলে শোভে কর্ণদ্বয় ॥
দুই বাহু শঙ্খেতে শোভিত বিলক্ষণ।

শঙ্খের উপরে সাজে সোনার কঙ্কণ ॥
বসন পরায় তারে সুন্দর প্রচুর।
দুই পায়ে দিল তার বাজন নূপুর ॥
সুবর্ণ আসনে বসিলেন রূপবতী।
চারিদিকে জ্বালি দিল সোহাগের বাতি ॥
চারি ভগিনীতে বেশ করে বিলক্ষণ।
তখন মণ্ডপে গিয়া দিল দরশন ॥
পুষ্পাঞ্জলি দিয়া তবে নমস্কার করে।
প্রদক্ষিণ সাতবার করিল রামেরে ॥
অবগুণ্ঠন ঘুচাইল যত বন্ধুগণ।
সীতা-রামে পরস্পর হইল দরশন ॥
জলধারা দিয়া তারা কন্যা নিল পরে।
শোয়াইল জানকীরে অন্ধকার ঘরে ॥
হস্তে ধরি আনাইল রামেরে তখন।
হস্তে ধরি তোল সীতা বন্ধুজন ॥
স্ত্রীলোকেরা পরিহাস করে ছল পেয়ে।
কেহ বলে হস্তে ধর কেহ বলে পায়ে ॥
পূর্ব্বাপর বর-কন্যা আইল দুইজনে।
রোহিণীর সহ চন্দ্র যেমন গগনে ॥
কন্যাদান করে রাজা বিবিধ প্রকারে।
পঞ্চ হরিতকী দিয়া পরিহার করে ॥
বহু দাস দাসী রাজা দিল কন্যা-বরে।
জলধারা দিয়া কন্যা-বর লইল ঘরে।
রাজা রাণী গিয়া পরে করিল রন্ধন।
কন্যা বর দুই জনে করিল ভোজন ॥
সাজায় বাসরঘর যত সখীগণ।
রাম সীতা তাহাতে রহেন দুইজন ॥

□□

৪

# শ্যাম-সুন্দর

## চণ্ডীদাস

(ষোড়শ শতাব্দী)

সুধা ছানিয়া কেবা ও সুধা ঢেলেছে গো
তেমতি শ্যামের চিকন দেহা।
অঞ্জন গঞ্জিয়া কেবা খঞ্জন আনিল রে
চাঁদ নিঙাড়ি কৈল থেহা ॥
থেহা নিঙাড়িয়া কেবা মুখানি বনাল রে
জবা নিঙাড়িয়া কৈল গণ্ড।
বিম্বফল জিনি কেবা ওষ্ঠ গড়ল রে
ভুজে জিনিয়া করি-শুণ্ড ॥
কম্বু জিনিয়া কেবা কণ্ঠ বনাইল রে
কোকিল জিনিয়া সুস্বর।
আরদ্র মাখিয়া কেবা সারদ্র বনাইল রে
ঐছন দেখি নীতাম্বর ॥
বিস্তারি পাষাণে কেবা রতন বসাইল রে
এমতি লাগয়ে বুকের শোভা।
দাম কুসুমে কেবা সুষম করেছে রে
এমতি তণুর দেখি আভা ॥
আদলি উপরে কেবা কদলী রোপিল রে
ঐছন দেখি উরুযুগ।
অঙ্গুলি উপরে কেবা দর্পণ বনাইল রে
চণ্ডীদাস দেখে যুগে যুগে ॥

৫

# হতাশের আক্ষেপ

## জ্ঞা ন দা স

(ষোড়শ শতাব্দী)

সুখের লাগিয়া এঘর বাঁধিনু
অনলে পুড়িয়া গেল।
অমিয়া সাগরে সিনান করিতে
সকলি গরল ভেল॥
সখি, কি মোর করমে লেখি।
শীতল বলিয়া ও চাঁদ সেবিনু—
ভানুর কিরণ দেখি॥
উচল বলিয়া অচলে চড়িনু
পড়িনু অগাধ জলে।
লছমী চাহিতে দারিদ্র বেড়ল
মাণিক হারাণু হেলে॥
নগর বসানু সাগর বান্ধিনু
মাণিক পাবার আশে।
সাগর শুখাল মাণিক লুকালো
অভাগী-করম-দোষে॥
পিয়াস লাগিয়া জলদ সেবিনু
বজর পড়িয়া গেল।
জ্ঞানদাস কহে কানুর পীরিতি
মরণ অধিক শেল॥

# ৬ | কালকেতুর বিক্রম

## কবিকঙ্কণ মুকুন্দরাম চক্রবর্তী

(ষোড়শ শতাব্দীর শেষ ও সপ্তদশ শতাব্দীর প্রথমভাগ)

দিনে দিনে বাড়ে কালকেতু।
বলে মত্ত গজপতি, রূপে নব রতিপতি
সবার লোচন-সুখ-হেতু ।।
নাক মুখ চক্ষু কান কুন্দে যেন নিরমান,
দুই বাহু লোহার সাবল।
গুণ শীল রূপ বাড়া বাড়ে যেন শীল-কোঁড়া,
জিনি শ্যাম-চামর কুন্তল ।।
বিচিত্র কপালতটী, গলায় জালের কাঁঠি,
করযুগে লোহার শিকলি।
বুক শোভে ব্যাঘ্র-নখে, অঙ্গে রাঙ্গা ধূলি মাখে,
কটিতটে শোভয়ে ত্রিবলী ।।
কপাট বিশাল বুক, নিন্দি ইন্দিবর মুখ,
আকর্ণ আয়ত বিলোচন।
গতি জিনি গজরাজ, কেশরী জিনিয়া মাঝ,
মুক্তাপাতি জিনিয়া দশন ।।
দুইচক্ষু জিনি নাটা, ঘুরে যেন কড়ি ভাঁটা,
কানে শোভে স্ফটিক কুণ্ডল।
পরিধান বীর-ধড়ী, মাথায় জালের দড়ী,
শিশু মাঝে যেমন মণ্ডল ।।
লইয়া ফাউড়া ডেলা, যার সঙ্গে করে খেলা
তার হয় জীবন সংশয়।

যে জনে আঁকড়ি করে, পড়য়ে ধরণী পরে
ডরে কেহ নিয়ড়ে না রয় ॥
সঙ্গে শিশুগণ ফিরে, তাড়িয়া শশারু ধরে,
দূরে গেলে ছবায় কুকুরে।
বিহঙ্গ বাঁটুলে বিন্ধে, লতায় জড়িয়া বান্ধে,
স্কন্ধে ভার বীর আইসে ঘরে ॥
গণক আনিয়া ঘরে, শুভ তিথি শুভ বারে,
ধনু দিল ব্যাধ স্নুত-করে।
ফোঁটা দিয়া বিন্ধে রেঝা, ছাড়িতে শিখায় নেজা,
চামের টোপর দেয় শিরে ॥



# ৭ | শিবের দক্ষালয়ে যাত্রা

## রায়গুণাকর ভারতচন্দ্র রায়

(১৭১২-১৭৬০)

মহারুদ্ররূপে মহাদেব সাজে
ভভম্ভম্ ভভম্ভম্ শিঙ্গা ঘোর বাজে ॥
লটাপট্ জটাজট্ সংঘট্ট গঙ্গা।
ছলচ্ছল টলট্টল কলক্কল তরঙ্গা ॥
ফণাফণ্ ফণাফণ্ ফণীফন্ন গাজে।
দিনেশ প্রতাপে নিশানাথ সাজে ॥
ধক্‌ধ্বক্ ধক্‌ধ্বক্ জ্বলে বহ্নি ভালে।
ববম্বম্ ববম্বম্ মহাশব্দ গালে ॥
চলে ভৈরব ভৈরবী নন্দী ভৃঙ্গী।
মহাকাল বেতাল তাল ত্রিশৃঙ্গী
চলে ডাকিনী যোগিনী ঘোর বেশে।
চলে শাঁখিনী প্রেতিনী মুক্তকেশে ॥
গিয়া দক্ষ-যজ্ঞে সবে যজ্ঞ নাশে।
কথা না সরে দক্ষরাজে তরাসে ॥
অদূরে মহারুদ্র ডাকে গভীরে।
আরে রে অরে দক্ষ দে রে সতীরে ॥
ভুজঙ্গপ্রয়াতে কহে ভারতী দে।
সতী দে সতী দে সতী দে সতী দে ॥



৮

# শ্রেষ্ঠপূজা

## কবিরঞ্জন রামপ্রসাদ সেন

(আনুমানিক ১৭১৮–২৩ সালে জন্ম)

মন, তোর এত ভাবনা কেনে ?
একবার, কালী বলে বস্ রে ধ্যানে—
জাঁকজমকে করলে পূজা
অহঙ্কার হয় মনে মনে ;

তুমি লুকিয়ে তারে করবে পূজা
জানবে না রে জগজ্জনে।
ধাতু পাষাণ মাটির মূর্তি
কাজ কি রে তোর সে গঠনে ?

তুমি মনোময় প্রতিমা করি'
বসাও হৃদি পদ্মাসনে।
আলোচাল আর পাকা কলা
কাজ কি রে তোর আয়োজনে ;

তুমি ভক্তি-সুধা খাইয়ে তাঁরে
তৃপ্তি কর আপন মনে।
ঝাড়লণ্ঠন বাতির আলো
কাজ কি রে তোর সে রোশনাইয়ে,

তুমি মনোময় মানিক্য জ্বেলে'
দেও না জ্বলুক নিশিদিনে!
মেষ ছাগল মহিষাদি
কাজ কি রে তোর বলিদানে?

২০

তুমি—জয় কালী! জয় কালী! ব'লে—
বলি দাও ষড়রিপুগণে।
প্রসাদ বলে ঢাকে ঢোলে
কাজ কি রে তোর—সে বাজনে?

২৪

তুমি, জয় কালী' বলে দাও করতালি
মনে রাখ সেই শ্রীচরণে।



৯

# ফুল-কপি

## ঈশ্বরচন্দ্র গুপ্ত

মনোহর ফুলকপি পাতা যুক্ত তায়।
সাটিনের কাবা যেন বাবুদের গায় ॥
শ্রেণীবদ্ধ চারু শোভা এলো আর বাঁধা।
সাহেবেরা প্রেমডোরে চিরকাল বাঁধা ॥
রন্ধনেতে তার সঙ্গে যুক্ত হলে কই।
যত পাই তত খাই আর বলি কই ॥
ঘৃণার স্বভাবে যেই নাহি খায় কপি।
তারে কি মানুষ বলি নিজে সেই কপি ॥
কপির সকলি গুণ দোষ কিছু নাই।
তাতেই আমোদ বাড়ে যেরূপেতে খাই ॥

□ □

১০

# আত্মবিলাপ

## মাইকেল মধুসূদন দত্ত

১

আশার ছলনে ভুলি কি ফল লভিনু, হায় !
তাই ভাবি মনে।
জীবন-প্রবাহ বহি কালসিন্ধু পানে ধায়,
ফিরাব কেমনে ?
দিন দিন আয়ুহীন, হীনবল দিন দিন,—
তবু এ আশার নেশা ছুটিল না ?—এ কি দায় !

২

রে প্রমত্ত মন মম ! কবে পোহাইবে রাতি ?
জাগিবি রে কবে ?
জীবন-উদ্যানে তোর যৌবন-কুসুম-ভাতি
কত দিন রবে ?
নীর-বিন্দু-দুর্ব্বাদলে, নিত্য কি রে ঝলঝলে ?
কে না জানে অম্বুবিম্ব অম্বুমুখে সদ্যপাতি ?

৩

নিশার স্বপন-সুখে সুখী যে, কি সুখ তার ?
জাগে সে কাঁদিতে !
ক্ষণপ্রভা প্রভা-দানে বাড়ায় মাত্র আঁধার,
পথিকে বাঁধিতে !
মরীচিকা মরুদেশে, নাশে প্রাণ তৃষা-ক্লেশে ;
এ তিনের ছলসম ছল রে কু-আশার !

৪

প্রেমের নিগড় গড়ি পরিলি চরণে সাধে,
কি ফল লভিলি ?
জ্বলন্ত-পাবক-শিখা-লোভে তুই কাল ফাঁদে
উড়িয়া পড়িলি
পতঙ্গ যে রঙ্গে ধায়, ধাইলি, অবোধ, হায় !
না দেখিলি, না শুনিলি, এবে রে পরাণ কাঁদে !

৫

বাকি কি রাখিলি তুই বৃথা অর্থ অন্বেষণে,
সে সাধ সাধিতে ?
ক্ষত মাত্র হাত তোর মৃণাল-কন্টকগণে,
কমল তুলিতে !
নারিলি হরিতে মনি, দংশিল কেবল ফণী !
এ বিষম বিষ-জ্বালা ভুলিবি, মন, কেমনে ?

৬

যশোলোভ-লোভে আয়ু কত যে ব্যয়িলি হায়
কব তা কাহারে ?
সুগন্ধ কুসুম গন্ধে অন্ধকীট যথা ধায়,
কাটিতে তাহারে,—
মাৎসর্য-বিষদশন, কামড়েরে অনুক্ষণ !
এই কি লভিলি লাভ, অনাহারে অনিদ্রায় ?

৭

মুকুতা-ফলের লোভে ডুবে রে অতল জলে
যতনে ধীবর,
শত মুক্তাধিক আয়ু কালসিন্ধু জল-তলে
ফেলিস পামর !
ফিরে দিবে হারাধন, কে তোরে, অবোধ মন,
হায় রে, ভুলিবি কত আশার কুহক-ছলে !

১১

# জীবন সঙ্গীত

## হেমচন্দ্র বন্দ্যোপাধ্যায়

ব'লো না কাতর স্বরে বৃথা জন্ম এ সংসারে
এ জীবন নিশার স্বপন,
দারা পুত্র পরিবার তুমি কার, কে তোমার—
ব'লে জীব ক'রো না ক্রন্দন
মানব-জনম সার, এমন পাবে না আর,
বাহ্য দৃশ্যে ভুলো না রে মন ;
কর যত্ন হবে জয়, জীবাত্মা অনিত্য নয়,
অহে জীব কর আকিঞ্চন।
ক'রো না সুখের আশ, প'রো না দুঃখের ফাঁস,
জীবনের উদ্দেশ্য তা নয় ;
সংসারে সংসারী সাজ, করো নিত্য নিজ কাজ
ভবের উন্নতি যাতে হয়।
দিন যায়, ক্ষণ যায়, সময় কাহারো নয়,
বেগে ধায় নাহি রহে স্থির,
সহায় সম্পদ বল, সকলি ঘুচায় কাল,
আয়ু যেন শৈবালের নীর !
সংসার সমরাঙ্গনে, যুদ্ধ করো দৃঢ়পণে,
ভয়ে ভীত হ'য়ো না মানব !
কর যুদ্ধ বীর্যবাণ যায় যাবে যাক প্রাণ,
মহিমাই জগতে দুর্ল্লভ।
মহাজ্ঞানী মহাজন যে পথে করে গমন
হয়েছেন প্রাতঃস্মরণীয়,

সেই পথ লক্ষ্য ক'রে স্বীয় কীর্তি-ধ্বজা ধরে,
আমরাও হব বরণীয়।
সময়-সাগর তীরে, পদাঙ্ক অঙ্কিত ক'রে
আমরাও হব হে অমর ;
সেই চিহ্ন লক্ষ্য ক'রে, অন্য কোন জন পরে
যশোদ্বারে আসিবে সত্বর !

□ □

# ১২ | আশা

## নবীনচন্দ্র সেন

ধন্য, আশা কুহকিনী ! তোমার মায়ায়
মুগ্ধ মানবের মন, মুগ্ধ ত্রিভুবন।
দুর্বল মানবমনোমন্দিরে তোমায়
যদি না সৃজিত বিধি, হায়, অনুক্ষণ
নাহি বিরাজিতে তুমি যদি সে মন্দিরে—
শোক, দুঃখ, ভয়, ত্রাস, নিরাশপ্রনয়,
চিন্তার অচিন্ত্য অস্ত্র নাশিত অচিরে
সে মনোমন্দির শোভা ! পলাত নিশ্চয়
অধিষ্ঠাত্রী জ্ঞানদেবী ছাড়িয়া আবাস ;
উন্মত্ততা ব্যাঘ্ররূপে করিত নিবাস।
ধন্য, আশা কুহকিনী ! তোমার মায়ায়
অসার সংসার চক্র ঘোরে নিরবধি !
দাঁড়াইত স্থিরভাবে, চলিত না হায়,
মন্ত্রবলে তুমি চক্র না ঘুরাতে যদি !
ভবিষ্যৎ-অন্ধ মূঢ় মানব সকল
ঘুরিতেছে কর্মক্ষেত্রে বর্তুল-আকার
তব ইন্দ্রজালে মুগ্ধ ; পেয়ে তব বল
যুঝিছে জীবন-যুদ্ধ, হায়, অনিবার।
নাচায় পুতুল যথা দক্ষ বাজিকরে,
নাচাও তেমতি তুমি অর্বাচীন নরে।
ওই-যে কাঙাল বসি রাজপথ ধারে
দীনতার প্রতিমূর্তি—কঙ্কাল শরীর,

জীর্ণ পরিধেয় বস্ত্র দুর্গন্ধ–আধার,
দু নয়নে অভাগার বহিতেছে নীর।
ভিক্ষা করি দ্বারে দ্বারে এ তিন প্রহর
পাইয়াছে যাহা তাহে জঠর–অনল
নাহি হবে নির্বাপিত ; রুগ্ন কলেবর ;
চলে না চরণ, চক্ষে ঘোরে ধরাতল।
কী মন্ত্র কহিলে তুমি অভাগার কানে,
চলিল অভাগা পুনঃ ভিক্ষার সন্ধানে।
অথবা সুদূরে কেন করি অন্বেষণ ?
দুরাশার মন্ত্রে মুগ্ধ আমি মূঢ়মতি।
নতুবা যে পথে কোনো কবি বিচরণ
করেনি, সে পথে কেন হবে মম গতি ?
বঙ্গ–ইতিহাস, হায়, মনিপূর্ণ খনি !
কবির কল্পনালোকে কিন্তু আলোকিত
নহে যা, কেমনে আমি, বলো কুহকিনী,
মম ক্ষুদ্র কল্পনায় করি প্রকাশিত ?
না আলোকে যদি শশী তিমির রজনী,
নক্ষত্রের নহে সাধ্য উজলে ধরণী।
কোন্ পূণ্যবলে সেই খনির ভিতরে
প্রবেশি গাঁথিয়া মালা অবিদ্ধ রতনে
দোলাইব মাতৃভাষা–কম–কলেবরে—
সুকবি–সুকরে গাঁথা মহাকাব্য ধনে
সজ্জিত যে বরবপুঃ ?   কিম্বা অসম্ভব
নহে কিছু, হে দুরাশে, তোমার মায়ায় ;
কত ক্ষুদ্র নর, ধরি পদছায়া তব
লভিয়াছে অমরতা এ মর ধরায় ;
অতএব দয়া করি কহো, দয়াবতি,
কী চিত্রে রঞ্জিছ আজি শ্বেত সেনাপতি ?

১৩ |

# সমুদ্র-দর্শন

## বিহারীলাল চক্রবর্তী

এ কি, এ প্রকাণ্ড কাণ্ড সম্মুখে আমার !
অসীম আকাশ-প্রায় নীল জল-রাশি ;
ভয়ানক তোলপাড় করে অনিবার,
মুহূর্ত্তেকে যেন সব ফেলিবেক গ্রাসি !

আগু-পাছু কোটি কোটি কি কল্লোল মালা !
প্রকাণ্ড পর্বত সব যেন ছুটে আসে ;
উঃ ! কি প্রচণ্ড রব ! কানে লাগে তালা,
প্রলয়ের মেঘ যেন গরজে আকাশে !

তুলার বস্তার মত ফেনা রাশি রাশি,
তরঙ্গের সঙ্গে সঙ্গে চারিদিকে ধায় ;
রাশি রাশি সাদা মেঘ নীলাম্বরে ভাসি'
ঝড়ের সঙ্গেতে যেন ছুটিয়া বেড়ায় ।

আপনার মনে ওহে উদয় সাগর,
গড়ায়ে গড়ায়ে তুমি চলেছ সদাই ;
প্রাণীদের কলরবে পোরা চরাচর,
কিন্তু তব কিছুতেই ভ্রূক্ষেপ নাই ।

ধরাধামে তব সম কেহ নাহি পারে
বিস্ময় আনন্দ-রসে আলোড়িতে মন ;

অখিল ব্রহ্মাণ্ড আছে তোমার ভাণ্ডারে,
নিসর্গের তুমি এক বিচিত্র দর্পণ।

কোথাও ধবলাকার কেবল বরফ,
কোথাও তিমিরময় দেদার আঁধার,
কোথাও জ্বলন-জ্বালা জ্বলে দপ্ দপ্,
সকল স্থানেই তুমি অনন্ত অপার!

পুরা কালে তব তটে কত কত দেশ,
ঐশ্বর্য্য কিরণে বিশ্ব করেছিল আলো;
যেমন এখন পরি' মনোহর বেশ,
কত দেশ বেলাভূমে সেজে আছে ভাল!

দেবের দুর্ল্লভ লঙ্কা, ভূস্বর্গ দ্বারকা,
কালের দুর্জ্জয় যুদ্ধে হয়েছে নিধন,
আলো কোরে ছিল রাত্রে যে সব তারকা,
ক্রমে ক্রমে নিভে তারা গিয়েছে কখন!

কিন্তু নেই সর্ব্বজয়ী মহাবল কাল,
যার নামে চরাচর কাঁপে থরথরি—
আপনার জয়চিহ্ন যুঝে চিরকাল
দাগিতে পারেনি তব ললাট উপরি।

সত্যযুগে আদি মনু যেমন তোমায়
হেরেছেন, হেরিতেছি আমিও তেমন;
কাল তব সঙ্গে শুধু গড়ায়ে বেড়ায়
জাহির করিতে নারে বিক্রম আপন।

এই যে দাঁড়ায়ে পুনঃ সেই কিনারায় !
বহিছে তরঙ্গ রঙ্গে সেই জলরাশি
উদার সাগর দাও বিদায় আমায় !
আজিকার মত আমি আসি তবে আসি ৪৪



১৪

# ধন ধান্যে পুষ্পে ভরা

দ্বিজেন্দ্রলাল রায়

ধন ধান্যে পুষ্পে ভরা, আমাদের এই বসুন্ধরা,
তাহার মাঝে আছে দেশ এক সকল দেশের সেরা,
সে যে স্বপ্ন দিয়ে তৈরী,
সে যে স্মৃতি দিয়ে ঘেরা।
এমন দেশটি কোথাও খুঁজে পাবে নাকো তুমি,
সকল দেশের রাণী সে যে আমার জন্মভূমি ॥
পুষ্পে পুষ্পে ভরা শাখি, কুঞ্জে কুঞ্জে ডাকে পাখি
গুঞ্জরিয়া আসে অলি পুঞ্জে পুঞ্জে ধেয়ে
তারা ফুলের উপর ঘুমিয়ে পড়ে
ফুলের মধু খেয়ে।
এমন দেশটি কোথাও খুঁজে পাবে নাকো তুমি,
সকল দেশের রাণী সে যে আমার জন্মভূমি ॥

*　　*　　*　　*

ভায়ের মায়ের এমন স্নেহ কোথায় গেলে পাবে কেহ,
ওমা, তোমার চরণ দুটি বক্ষে আমার ধরি,
আমার এই দেশেতে জন্ম,
যেন এই দেশেতে মরি
এমন দেশটি কোথাও খুঁজে পাবে নাকো তুমি,
সকল দেশের রাণী সে যে আমার জন্মভূমি ॥

□ □

১৫

# ভারতের জয়

সত্যেন্দ্রনাথ ঠাকুর

১

মিলে সবে ভারত সন্তান
একতান মন প্রাণ,
গাও ভারতের জয়গান ।।

২

ভারত ভূমির তুল্য আছে কোন স্থান ?
কোন্ অদ্রি ( অভ্রভেদী ) হিমাদ্রি সমান ?
ফলবতী বসুমতী, স্রোতস্বতী পুণ্যবতী,
শতখনি রত্নের নিধান ।।
হোক্ ভারতের জয়,
জয় ভারতের জয়,
গাও ভারতের জয়,
কি ভয়, কি ভয়,
গাও ভারতের জয় ।।

৩

রূপবতী সাধ্বী সতী, ভারত ললনা,
কোথা দিবে তাদের তুলনা ?
শর্মিষ্ঠা সাবিত্রী সীতা, দময়ন্তী পতিব্রতা
অতুলনা ভারত ললনা ।।
হোক্ ভারতের জয়,
জয় ভারতের জয়,
গাও ভারতের জয়,

কি ভয়, কি ভয়,
গাও ভারতের জয় ॥

৪

বশিষ্ঠ গৌতম অত্রি, মহামুনিগণ
বিশ্বামিত্র ভৃগু তপোবন।
বাল্মিকী বেদব্যাস, ভবভূতি কালিদাস
কবিকূল ভারতভূষণ ॥
হোক্ ভারতের জয়,
জয় ভারতের জয়,
গাও ভারতের জয়,
কি ভয়, কি ভয়,
গাও ভারতের জয় ॥

৫

বীরযোনী এই ভূমি বীরের জননী ;
অধীনতা আনিল রজনী ;
সুগভীর সে তিমির, ব্যাপিয়া কি রবে চির,
দেখা দিবে দীপ্ত দিনমনি ॥
হোক্ ভারতের জয়,
জয় ভারতের জয়,
গাও ভারতের জয়,
কি ভয়, কি ভয়,
গাও ভারতের জয় ॥

৬

ভীষ্ম দ্রোণ ভীমার্জ্জুন নাহি কি স্মরণ,
পৃথিরাজ আদি বীরগণ ?
ভারতের ছিলো সেতু, যবনের ধূমকেতু
আর্তবন্ধু দুষ্টের দমন ॥
হোক্ ভারতের জয়,
জয় ভারতের জয়,

গাও ভারতের জয়,
কি ভয়, কি ভয়,
গাও ভারতের জয় ॥

৭

কেন ডর, ভীরু, কর সাহস আশ্রয়,
যতো ধর্ম স্ততো জয় ॥
ছিন্ন ভিন্ন হীনবল, ঐক্যেতে পাইবে বল,
মায়ের মুখ উজ্জ্বল করিতে কি ভয়?
হোক্ ভারতের জয়,
জয় ভারতের জয়,
গাও ভারতের জয়,
কি ভয়, কি ভয়,
গাও ভারতের জয় ॥



১৬

# পাছে লোকে কিছু বলে

কামিনী রায়

করিতে পারি না কাজ,
সদা ভয়, সদা লাজ;
সংশয়ে সঙ্কল্প সদা টলে,
পাছে লোকে কিছু বলে!

আড়ালে আড়ালে থাকি,
নীরবে আপনা ঢাকি,
সম্মুখে চরণ নাহি চলে,
পাছে লোকে কিছু বলে!

হৃদয়ে বুদ্‌বুদ্‌ মত,
উঠে শুভ্র চিন্তা কত,
মিশে যায় হৃদয়ের তলে,
পাছে লোকে কিছু বলে!

কাঁদে প্রাণ যবে আঁখি,
সযতনে শুষ্ক রাখি,
নিরমল নয়নের জলে,
পাছে লোকে কিছু বলে!

একটি স্নেহের কথা
প্রশমিতে পারে ব্যাথা—
চলে যাই উপেক্ষার ছলে,
পাছে লোকে কিছু বলে!

মহৎ উদ্দেশ্যে যবে
একসাথে মিলে সবে,

